॥ श्री ॥

श्रीमत्सायणमाधवाचार्यप्रणीत

सर्वदर्शनसङ्ग्रहान्तर्गत

# रसेश्वरदर्शन

मूळ संस्कृत संहिता, शब्दार्थ आणि मराठी भाषांतर


भाषांतर व संपादक

डॉ. नीलेश जोशी

M.A. Sanskrit, NET, SET, Ph.D. व्याकरणशास्त्री,

वरिष्ठ भाषाशास्त्रज्ञ, IIT मुंबई.






eBook Publication Pvt. Ltd.®

प्रथमावृत्तिः मार्च २०१७

|| श्री ||

श्रीमत्सायणमाधवाचार्यप्रणीत

सर्वदर्शनसङ्ग्रहान्तर्गत

# रसेश्वरदर्शन

## मूळ संस्कृत संहिता, शब्दार्थ आणि मराठी भाषांतर

भाषांतर व संपादक

डॉ. नीलेश जोशी

M.A. Sanskrit, NET, SET, Ph.D. व्याकरणशास्त्री,

वरिष्ठ भाषाशास्त्रज्ञ, IIT मुंबई.




eBook Publication Pvt. Ltd.®

प्रथमावृत्तिः मार्च २०१७

# रसेश्वरदर्शन,

**मूळ संस्कृत संहिता, मराठी भाषांतर, पदार्थ व विवेचक टीपांसह**

**भाषांतर व संपादक : डॉ. नीलेश जोशी,**

**वरिष्ठ भाषाशास्त्रज्ञ, IIT मुंबई,**

**पवई, महाराष्ट्र ४०००७६**

**प्रथमावृत्तिः- चैत्र-शुक्ल-प्रतिपदा, ३१ मार्च २०१७**

**प्रकाशक:**

**eBook Publication Pvt. Ltd.**®

4/47, उदय को. हौ. सोसायटी,

आरे रोड, गोरेगाव पश्चिम,

मुंबई, महाराष्ट्र, भारत, ४०००६२

**Telephone:** +91 7038164022

**Email:** publicationebook@gmail.com

**Website:** https://archive.org/details/@ebook_publcation

© **सर्वाधिकार संपादकांकडे सुरक्षित आहेत.**

# eBook Terms & Conditions

## 1. This eBook* may be

a. Distributed without modification or sale.

b. Copied for personal and educational use.

c. Printed for personal and educational use.

## 2. This eBook* may NOT be

a. Sold individually or as part of package.

b. Modified in any way.

c. Reversed-engineered.

**This eBook* and all its content including images are Copyright © 2017 Dr. Nilesh Joshi- All rights reserved.**

***eBook refers to this PDF and any of its content including pages and images in either electronic or printed form.**

# अनुक्रमणिका

# संक्षेपांचा खुलासा

च.चि. = चरकसंहिता-चिकित्सास्थानम्

च.सू. = चरकसंहिता-सूत्रस्थानम्

धा.पा. = धातुपाठः पाणिनीयः

र.अ. = रसार्णवम्

र.त. = रसतरङ्गिणी

र.चि. = रसेन्द्रचिन्तामणि

र.मं. = रसमञ्जरी

र.रत्न.स. = रसरत्नसमुच्चयः

र.रत्ना. = रसरत्नाकरः

रसे.सं. = रसेन्द्रसंग्रहः

र.हृ. = रसहृदयतन्त्रम्

रा.नि. = राजनिघण्टु

सु.सू. = सुश्रुतसंहिता-सूत्रस्थानम्

# प्रस्तावना

**सर्वदर्शनाभिमतं जीवन्मुक्तिदायकम् |**

**पारदादिवेदनीयं नमाम्यहं रसेश्वरम् ||**

येथे **सर्वदर्शनाभिमतम्** म्हणजे सर्व दर्शनकारांनी मान्य केलेली असा अर्थ आहे. आता सर्व दर्शनकारांचा विचार करता जीवन्मुक्ती वा मोक्ष संकल्पना विभिन्न प्रकारे मांडली आहे. ती विभिन्न भारतीय दर्शने म्हणजे- (1) मीमांसा (2) न्याय (3) वैशेषिक (4) सांख्य (5) योग (6) वेदान्त ही प्रमुख सहा दर्शने असून षड्दर्शन म्हणून ओळखली जातात, यांनाच आस्तिकदर्शने किंवा वैदिक दर्शने म्हणतात. याशिवाय (१) चार्वाक (२) बौद्ध (३) जैन ही तीन नास्तिक किंवा अवैदिक दर्शने म्हणतात. या ९ दर्शनांशिवाय सायण-माधवाचार्यांनी **सर्वदर्शनसंग्रह** नामक ग्रंथात (१) रामानुजदर्शन (२) पूर्णप्रज्ञदर्शन (३) पाशुपतदर्शन (४) शैवदर्शन (५) प्रत्यभिज्ञादर्शन (६) रसेश्वरदर्शन (७) पाणिनीदर्शन या नवीन ७ दर्शनांचा समावेश केला आहे. (Abhyankar, 1924)[1]

थोडक्यात, या सर्व दर्शनांमध्ये संसारचक्रात त्रस्त झालेल्या जीवाच्या मुक्तीचा विचार मांडला आहे. त्यामुळे येथे जीवन्मुक्ती केवळ शैवसंप्रदायास मान्य आहे म्हणून चालणार नाही, कारण वेदान्त अर्थात केवलाद्वैताच्या शांकरपरंपरेतील विद्यारण्य (१२९६-१३८६) यांचा

---

[1] Abhyankar, V. S. (1924). सर्वदर्शनसंग्रह, दर्शनाङ्कुरव्याख्या. Mumbai: Nirnaya Sagar Press, Mumbai, *see- ग्रंथानुक्रम.*

जीवन्मुक्तीवर अधिक सखोल विवरण करणारा **जीवन्मुक्तिविवेक** ग्रंथ प्रसिद्ध आहे. (जोशी, केवलाद्वैतवाद)[2]

त्यातील रसेश्वरदर्शनाच्या प्रारंभीच पहिला शब्दच "**अपरे माहेश्वरा**" असा आहे, यामध्ये सायणमाधवाचार्यांना काही सुचवायचे आहे ते स्पष्ट करणे गरजेचे आहे.

**अपरे** म्हणजे कोण तर माहेश्वर संप्रदायातीलच पण पूर्वोक्त तीन शैवदर्शनाहून व्यतिरिक्त रसेश्वरदर्शनकार होय. यापूर्वी शैवदर्शनाची तीन दर्शने सांगितली आहेत, १) **पाशुपतदर्शन, २) शैवदर्शन, ३) प्रत्यभिज्ञादर्शन**; या पूर्व दर्शनकारांनी सांगितलेल्या मार्गाहून भिन्न जीवन्मुक्तीचा उपाय सांगणारे म्हणून अन्य माहेश्वर अर्थात **अपरे माहेश्वराः.**

आणि दर्शनाङ्कुरव्याख्येतील **पूर्वेषामिवैषामपि संमत**[3] या पदातून जीवब्रह्मैक्य प्रतिपादन हा अद्वैतवादाचा मुख्य सिद्धान्त असला (जोशी, केवलाद्वैतवाद) तरी शैवदर्शनातील **रसेश्वरदर्शन** हे शेवटचे दर्शन असून **प्रत्यभिज्ञादर्शन** हे रसेश्वरदर्शनाची अगदी पूर्वी सर्वदर्शनसंग्रह ग्रंथात सांगितले आहे आणि प्रत्यभिज्ञादर्शन शैव संप्रदायाची ही अव्दैतवादी शाखा होय. शैव तंत्रागमाचा अनुयायी वसुगुप्त (इ. स. ८२५) ह्याने शैवमताला अव्दैतवादी स्वरूप दिले. (कुलकर्णी, शैव संप्रदाय) त्यामुळे

---

[2] जोशी, ल. (एन. डी.). केवलाद्वैतवाद. मध्ये ल. जोशी, मराठी विश्वकोश, खण्ड ४.

[3] Abhyankar, V. S. (1924). *सर्वदर्शनसंग्रह, दर्शनाङ्कुरव्याख्या.* Mumbai: Nirnaya Sagar Press, Mumbai, pg.२०२

प्रस्तुत पदाने रसवादी माहेश्वर हे जीव व ब्रह्म यांचे ऐक्य मानतात जे शैव संप्रदायाच्या विरुद्ध नाही कारण ते यापूर्वीच प्रत्यभिज्ञावादींनी सिद्ध केले आहे.

म्हणून **अपि** पदाने जीव व ब्रह्म यांच्यातील अद्वैत मान्य आहे असे असून सुद्धा आम्ही **पिण्डस्थैर्ये** अर्थात या जीवात्म्याचे निवास स्थान असलेल्या देहाच्या स्थिरतेसाठी **पारद** नावाने ओळखला जाणारा **रससिद्धान्त** वर्णन करीत आहोत हा तात्पर्यार्थ होय.

आता रसेश्वरदर्शन ग्रंथाच्या संपादनाविषयी जाणून घेणे गरजेचे आहे.

**रसेश्वरदर्शन संहिता सिद्धी-**

रसेश्वरदर्शन असा स्वतंत्र ग्रंथ नसून सर्वदर्शन संग्रह या ग्रंथाचा एक भाग आहे. हा एक भाग स्वतंत्र रूपांमध्ये संपादित करताना सर्वदर्शनसंग्रहाच्या उपलब्ध प्रकाशित आवृत्त्यांचा आधार घेतला त्या पुढीलप्रमाणे-

- SARASWATI, M. (1906). Sarva Darshan Sangrah, . Pune : ANAND ASHRAM MUDRANALAY.
- Abhyankar, V. S. (1924). सर्वदर्शनसंग्रह, दर्शनाङ्कुरव्याख्या. Mumbai: Nirnaya Sagar Press, Mumbai.
- SINGH, P. U. (1962). Sarva Darshan Sangrah. Mumbai: Khemaraj Shrikrushnadas, SHRI VETESHWER Press Mumbai.

- कंगले, र. प. (१९८५). सर्वदर्शनसंग्रह, सटीप मराठी भाषांतर. मुंबई: महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई .

तसेच रसेश्वरदर्शनांतर्गत उद्धृत रसशास्त्राच्या मूळ ग्रंथाचा देखील आधार घेतला आहे, जसे-

- बापट, क. व. (१९०५). रसरत्नसमुच्चयः . पुणे: आनंदाश्रम, पुणे.
- Aacharya Yadav, T. G. (1927). रसहृदयतन्त्रम्, मुग्धावबोधिनी समाख्यासमुल्लसितम्. Lahore: Motilaal Banarasi Das.
- Krishnadas, K. (1966). रसरत्नाकर, . Mumbai: Kshemraj Krishnadas.
- Prafulla chandra Ray, H. c. (1985). रसार्णवम्. Calcutta: The Asiatic Society.

**पाठभेद व तद्विषयक दृष्टिकोन-**

१) **पारदो गदितो यस्मात्परार्थं साधकोत्तमैः ।। र.अ.१.३५ ।।**

**यस्मात्परार्थं-**

पाठभेदाच्या दृष्टीने हा पाठ अत्यंत महत्त्वाचा आहे. इथे यस्मात् व परार्थम् अशी दोन पदे आहेत. त्यातील प्रथम पद यस्मात् या विषयी पाठभेदांचा विचार करावा लागेल. कारण सर्वदर्शनसंग्रह नामक ग्रंथांच्या

अभ्यंकरशास्त्रीची दर्शनांकुर आवृत्ती[4], आनंदाश्रम प्रकाशित आवृत्ती[5], पं. उदय सिंघ यांची खेमराज आवृत्ती[6], आणि महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ आवृत्ती[7] या चारही आवृत्त्यांमध्ये **यस्मात् परार्थं** असाच पाठ आढळतो; यास्तव सर्वदर्शनसंग्रहाचा एक भाग म्हणून रसेश्वर दर्शनाच्या या ठिकाणी आम्हीदेखील हाच पाठ दिला आहे.

मग शंका येते की पाठभेदाचा प्रश्न आला कुठे, तर याचे उत्तर असे की याठिकाणी उद्‌धृत श्लोक हा स्पष्टपणे **रसार्णवेऽपि** असे म्हंटल्यामुळे गोविंदाचार्य विरचित रसार्णवम् या रसशास्त्रावरील ग्रंथातील आहे. जेव्हा हा श्लोक रसार्णव ग्रंथात शोधतो तेव्हा पाठ आढळतो तो पुढीलप्रमाणे-

**पारदो गदितो यश्च परार्थं साधकोत्तमैः ॥ र.अ.१.३५ ॥**

उपरोक्त ठिकाणी **यस्मात्** ऐवजी **यश्च** असा पाठ प्रफुल्लचंद्र रे यांनी संपादित आवृत्तीमध्ये आढळतो[8], यामध्ये ५ हस्तलिखितांचा आधार घेण्यात आला आहे. ही हस्तलिखिते काश्मीर, बिकानेर, डेक्कन आणि

---

[4] (Abhyankar, 1924),ibid,pg.202

[5] (SARASWATI, 1906), Sarva Darshan Sangrah,Pune : ANAND ASHRAM MUDRANALAY, pg.80

[6] (SINGH, 1962), Sarva Darshan Sangrah. Mumbai: Khemaraj Shrikrushnadas, SHRI VETESHWER Press Mumbai, pg.160

[7] (कंगले, १९८५), सर्वदर्शनसंग्रह, सटीप मराठी भाषांतर. मुंबई: महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

[8] (Prafulla chandra Ray, 1985), ibid, pg.6

मैसूर ग्रंथालयातून संकलित करून ही आवृत्ती संपादित केली आहे[9]; त्यामुळे ही चिकित्सक संशोधित आवृत्ती असून ती अत्यंत प्रामाणिक आवृत्ती समजली जाते.

त्यानंतर पुढे ही आवृत्ती जॉर्ज ऑगस्ट विद्यापीठ, गोटेंगन, जर्मनी यांचे GRETIL e-libray[10] नामक online ग्रंथालय, Sanskritworld[11] यांच्या Ayurved, alchemy विभागात, Rasavidyā, Computer-based analysis of Indian alchemy[12] या जर्मन संस्थेने देखील हाच पाठ स्वीकारला आहे. तसेच याची जर्मन भाषेत आवृत्तीदेखील उपलब्ध आहे[13]. [ टीप या सर्व संस्थांच्या संकेतस्थळाचे संदर्भ तळटीपेत दिले आहेत.]

यावरून स्पष्ट होते की आयुर्वेद अभ्यासकांच्या दृष्टीने **यस्मात् परार्थं** हा पाठ सदोष ठरू शकतो, कारण मूळ ग्रंथात हा पाठ **यश्च परार्थं** असा आहे. त्यामुळे येथे दोन्ही पाठ निर्देश करणे गरजेचे होते.

**२) सुप्तोऽयं मत्समो देवि मम प्रत्यङ्गसंभवः ।**

**मम देहरसो यस्माद्रसस्तेनायमुच्यते ॥ इति ।र.अ.१.३६ ।।**

**सुप्तोऽयम्-**

[9] (Prafulla chandra Ray, 1985), ibid, *see*.preface

[10] http://gretil.sub.uni-goettingen.de/gretil.html

[11] https://www.sanskritworld.in/index/detailview/book_id/rasarnava

[12] http://www.sanskritreader.de/rasavidya/index.php?contents=texte&lng=en

[13] http://www.sanskritreader.de/rasavidya/rasavidya.php?lng=de

येथे सुप्तः + अयम् अशी दोन पदे आहेत. यातील सुप्त हे पारद यासाठी वापरले आहे. याठिकाणी प्रथम पाठभेदांविषयी चर्चा करणे गरजेचे आहे.

**सुप्तोऽयम्** हा पाठ अभ्यंकरशास्त्री यांच्या सर्वदर्शनसंग्रहवरील दर्शनांकुरटीका आवृत्ती[14], आनंदाश्रम प्रकाशित आवृत्ती[15], पं. उदय सिंघ यांची खेमराज आवृत्ती[16], आणि महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ आवृत्ती[17] या चारही आवृत्त्यांमध्ये आढळून येतो; म्हणून **यस्मात्परार्थं** यापूर्वीच्या पाठानुसार येथेही सर्वदर्शनसंग्रहातील पाठ म्हणून हा पाठ स्वीकारला आहे.

यातील सुप्त हे **ञिष्वपँ शये (धा.पा.०२.६३)** या अदादी गणातील धातूचे क्त-प्रत्ययान्त रूप आहे. याचा अर्थ झोपलेला असा होतो. जो निद्रिस्त अवस्थेत असलेला तो सुप्त होय.

आयुर्वेदात हे पद विशेषण म्हणून वापरलेले आढळते. चरकसंहितेत -

**हृदयं कफहृद्रोगे सुप्तं स्तिमितभारिकम्।**

**तन्द्रारुचिपरीतस्य भवत्यश्मावृतं यथा।।च.सू.१७.३५।।**

---

14 (Abhyankar, 1924),ibid,pg.202

15 (SARASWATI, 1906), ibid,pg.80

16 (SINGH, 1962), ibid, pg.160

17 (कंगले, १९८५), सर्वदर्शनसंग्रह, सटीप मराठी भाषांतर. मुंबई: महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

या ठिकाणी वापरलेले **सुप्त** पद **मन्दक्रियम्** या अर्थी वापरले आहे. तर चिकित्सास्थानात मंदवेदना असलेला, दुःख या अर्थी आढळतो-

**निपीडितोन्नते स्तब्धे सुप्ते तत्पार्श्वपीडनात्।**

**तत्रैव पिण्डिते शूले सम्पक्वं गुल्ममादिशेत्।।च.चि.५.४३।।**

येथील **सुप्ते** पदाचा अर्थ आयुर्वेददीपिकाव्याख्याकार चक्रपाणिदत्त **मंदवेदनम्** असा करतो.[18] तर याशिवाय ज्ञान नसेलेला, निरिन्द्रिय, जड या अर्थी सुश्रुताने सूत्रस्थानात प्रयोग केलेला दिसतो-

**वायावुच्छ्रितकठिनसुप्तमांसे.....।।सु.सू.१२.१०।।**

यातील **सुप्त** याचा अर्थ टीकाकार डल्हणाने **अचेतन** असा केलेला दिसतो.[19]

थोडक्यात, यावरून स्पष्ट होईल की सुप्त या शब्दाचा पारद या अर्थी आयुर्वेदात कुठेही प्रयोग आढळत नाही किंवा कोणताही कोश **सुप्त** हा पारदाचा समानार्थी शब्द म्हणून देत नाही. हा केवळ सर्वदर्शनसंग्रह गत रसेश्वरदर्शनातच वापरलेला दिसतो.

गोविंदाचार्य विरचित **रसार्णवम्** या रसशास्त्रावरील ग्रंथातील आहे. जेव्हा हा श्लोक रसार्णव ग्रंथात शोधतो, तेव्हा हा पाठ आढळतो तो पुढीलप्रमाणे-

---

[18] **सुप्ते इति मन्दवेदने इत्यर्थः।** (चरक, 2010), ibid,च.चि.५.४३

[19] **सुप्तमचेतनम्। नाडीति व्रणविशेषः।** (सुश्रुत, 2010), ibid,सु.सू.१२.१०

**सूतोऽयं मत्समो देवि मम प्रत्यङ्गसम्भवः ॥ र.अ.१.३६ ॥**

उपरोक्त ठिकाणी **सुप्तोऽयम्** ऐवजी **सूतोऽयं** असा पाठ प्रफुल्लचंद्र राय यांनी संपादित आवृत्तीमध्ये आढळतो[20], तेथे त्यांनी तळटीपेमध्ये **सुप्तोऽयम्** असा पाठभेद **स.द.स.** या तीन हस्तलिखितांमध्ये आढळतो असे स्पष्ट केले आहे.[21] यावरून स्पष्ट होते की हा देखील एक पाठभेद आढळतो, जो सर्वदर्शनसंग्रहकारांच्या समोर होता आणि तो त्यांनी अधिकृतरीत्या स्वीकारला.

पण **रसार्णव** ग्रंथाच्या आवृत्तीमध्ये **सूतोऽयं** असाच पाठ स्वीकारला यामागचे मुख्य कारण असे की यापूर्वी सांगितल्याप्रमाणे रसशास्त्राच्या सर्वग्रंथात पारदाची जी मुख्य ५ नावे आढळतात, त्यापैकी **सूत** हे एक नाव आहे, आणि नावाची व्युत्पत्ती देताना संदर्भ वापरला जातो.

**३) नानावर्णो -**

येथे पाऱ्याच्या **मूर्च्छित** अवस्थेविषयी सांगताना पुढील श्लोक रसेश्वरदर्शनकार उद्धृत करतात.

**नानावर्णो भवेत्सूतो विहाय घनचापलम् ।**

**लक्षणं दृश्यते यस्य मूर्च्छितं तं वदन्ति हि ॥रसेश्वरदर्शन॥**

---

[20] (Prafulla chandra Ray, 1985), ibid, pg.6

[21] स.द.सं. reads **सुप्तोऽयम्,** (Prafulla chandra Ray, 1985), ibid, pg.6

यातील प्रथम पद **नानावर्णः** यामुळे हा श्लोक केवळ रसेश्वर दर्शनाचा भाग बनतो. हा पाठ अभ्यंकरशास्त्री यांच्या सर्वदर्शनसंग्रहवरील दर्शनांकुरटीका आवृत्ती[22], आनंदाश्रम प्रकाशित आवृत्ती[23], पं. उदय सिंघ यांची खेमराज आवृत्ती[24], आणि महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ आवृत्ती[25] या चारही आवृत्त्यांमध्ये आढळून येतो.

पण रसशास्त्राच्या ग्रंथापैकी **रसार्णव** या ग्रंथात प्रस्तुत श्लोक तंतोतंत जुळणारा आढळतो-

**नागवर्णो भवेत्सूतो विहाय घनचापलम् ।**

**लक्षणं दृश्यते यस्य मूर्च्छितं तं वदन्ति हि ॥ र.अ.११.११९ ||**

येथे **नानावर्णः** या पदाच्या स्थानी **नागवर्णः** हा पाठ आहे. येथे याचा अर्थ होतो की तो नाग वर्णाचा रंगाचा होतो. नाग रंग हा नारंगी या अर्थी चरकसंहितेत संत्रे या फलाचा उल्लेख करताना वापरेला दिसतो-

**दुर्जरं वातशमनं नागरङ्गफलं गुरु || च.सू.२७.१५६||**

तर नाग हा शब्द एक खनिज सिसे या अर्थी रसरत्नसमुच्चय ग्रंथात वापरलेला आहे-

---

[22] (Abhyankar, 1924),ibid,pg.202

[23] (SARASWATI, 1906), ibid,pg.80

[24] (SINGH, 1962), ibid, pg.160

[25] (कंगले, १९८५), सर्वदर्शनसंग्रह, सटीप मराठी भाषांतर. मुंबई: महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

**काष्ठौषध्यो नागे नागो वङ्गेऽथ वङ्गमपि शुल्बे ।र.रत्न.स.१.४१ ||**

येथेच पारा, गंधक आणि शिसेयुक्त पारदयोग आहे जो **नागसुंदर** नावाने ओळखला जातो. **रसरत्नसमुच्चय** ग्रंथात अतिसार चिकित्सेत सांगतात.-

**नागभस्मरसव्योमगन्धैरर्धपलोन्मितैः ।**

**कुर्वीत कज्जलीं श्लक्ष्णां प्रक्षिपेत्तदन्तरम् || र.रत्न.स.१६.३६ ||**

इत्यादी प्रकारे सविस्तर वर्णित आहे.

त्यामुळे रसेश्वरदर्शनकारांनी दिलेला नानावर्णो हा पाठ रसशास्त्राच्या ग्रंथात उपलब्ध होत नाही, त्यामुळे येथे संदर्भ देता येत नाही. पण नागवर्ण हा मात्र पाठ उपलब्ध असून रसशास्त्रात मान्यता प्राप्त आहे.

**४) अक्षतश्च लघुद्रावी तेजस्वी निर्मलो गुरुः ।**

**स्फोटनं पुनरावृत्तौ बद्धसूतस्य लक्षणम् ॥ रसेश्वरदर्शन ॥**

**अक्षतश्च-**

येथे पाऱ्याचे तिसरे स्वरूप अर्थात बद्ध याचे विवेचन करीत आहेत. तत्पूर्वी येथे आलेल्या पाठाचा विचार करणे आवश्यक आहे. रसेश्वर दर्शनात बद्ध पाऱ्याचे लक्षण सांगताना **अक्षतश्च** असे पद आले आहे, हा पाठ अभ्यंकरशास्त्री यांच्या सर्वदर्शनसंग्रहवरील दर्शनांकुरटीका

आवृत्ती[26], आनंदाश्रम प्रकाशित आवृत्ती[27], पं. उदय सिंघ यांची खेमराज आवृत्ती[28], आणि महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ आवृत्ती[29] या चारही आवृत्त्यांमध्ये आढळून येतो; म्हणून **अक्षतश्च** यापूर्वीच्या पाठानुसार येथेही सर्वदर्शनसंग्रहातील पाठ म्हणून हा पाठ स्वीकारला आहे.

पण आयुर्वेद ग्रंथामधून हा श्लोक सायणमाधवाचार्य यांनी उद्धृत केला आहे, तेव्हा हा श्लोक रसमञ्जरी नामक ग्रंथात सापडतो-

**अक्षयी च लघुर्द्रावी तेजस्वी निर्मलो गुरुः ।**

**स्फुटनं पुनरावृत्तिर्बद्धसूतस्य लक्षणम् ॥ र.मं.२.५१ ॥**

येथे **अक्षयी** असा पाठ आहे, याचा अर्थ अक्षय गुण प्राप्त झालेला म्हणजे अग्नीवर ठेवला असता तो उडून जात नाही. अर्थात **अक्षत** याचा देखील हाच अर्थ अपेक्षित आहे. हाच पाठ निघण्टुरत्नाकरमध्येही दिसून येतो.

येथे केवळ मुख्य पाठभेदांचा विचार केला आहे, उपरोक्त पाठभेद हे अर्थाच्या दृष्टीने खूप महत्त्वाचे आहे; त्यामुळे त्याविषयी संपादन विषयक दृष्टिकोन स्पष्ट असणे गरजेचे होते.

---

[26] (Abhyankar, 1924),ibid,pg.202

[27] (SARASWATI, 1906), ibid,pg.80

[28] (SINGH, 1962), ibid, pg.160

[29] (कंगले, १९८५), सर्वदर्शनसंग्रह, सटीप मराठी भाषांतर. मुंबई: महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

**अनुपलब्ध संदर्भ-**

यामध्ये केवळ रससिद्धान्त, साकारसिद्धि हे ग्रंथ उपलब्ध होऊ शकले नाहीत अन्यथा सर्व उद्धृत श्लोकांचे संदर्भ दिले आहेत. ते अनुपलब्ध संदर्भ श्लोक पुढीलप्रमाणे-

सर्व प्रथम खंड १० मध्ये पुढील श्लोक येतो हा श्लोक कोठून घेता याचा कुठेही उल्लेख नसून प्रफुल्लचंद्र राय यांनी देखील आपल्या रसशास्त्रावरील ग्रंथात उल्लेख केलेला दिसत नाही. पण अर्थदृष्ट्या आणि रसेश्वर सिद्धांतदृष्ट्या हा अत्यंत महत्त्वाचा श्लोक आहे.

**अभ्रकस्तव बीजं तु मम बीजं तु पारदः ।**

**अनयोर्मेलनं देवि मृत्युदारिद्रयनाशनम् ॥ इति ।**[30]

खंड १२,१३, आणि १४ मध्ये **रसेश्वरसिद्धान्त** ग्रंथातील श्लोक म्हणून पुढील तीन श्लोक उद्धृत करतात-

**देवाः केचिन् महेशाद्या दैत्याः काव्यपुरःसराः ।**

**मुनयो वालखिल्याद्या नृपाः सोमेश्वरादयः ॥**

**गोविन्दभगवत्पादाचार्यो गोविन्दनायकः ।**

**चर्वटिः कपिलो व्यालिः कापालि: कन्दलायनः ।।**

---

30 Dr. Ray P.C. History of Hindu Chemistry, pg.lxxii

**एतेऽन्ये बहवः सिद्धा जीवन्मुक्ताश्चरन्ति हि।**

**तनुं रसमयीं प्राप्य तदात्मककथाचणाः ॥ इति ।**

खंड १९ मध्ये-

**अक्षतश्च लघुद्रावी तेजस्वी निर्मलो गुरुः ।**

**स्फोटनं पुनरावृत्तौ बद्धसूतस्य लक्षणम् ॥ इति ।**

उपरोक्त श्लोकातील केवळ **अक्षतश्च** पाठभेद वगळता हा श्लोक **रसमंजरी** नामक ग्रंथात सापडतो आणि तंतोतंत जुळतो.

यानंतर खंड ३३ आणि ३४ मध्ये **रसेश्वरसिद्धान्त** या ग्रंथातील श्लोक देतात-

**रसाङ्कमेयमार्गोक्तो जीवमोक्षोऽन्यथा तु न ।**

**प्रमाणान्तरवादेषु युक्तिभेदावलम्बिषु ॥**

**ज्ञातृज्ञेयमिदं विद्धि सर्वतन्त्रेषु संमतम् ।**

**नाजीवञ्ज्ञास्यति ज्ञेयं यदतोऽस्त्येव जीवनम् ॥ इति ।**

त्यानंतर खंड ३६ मध्ये

**साकारसिद्धि** नामक ग्रंथातील पुढील श्लोक आहे असा उल्लेख रसेश्वरदर्शनात येतो पण हा ग्रंथ उपलब्ध नाही.

**सच्चिन्नित्यनिजाचिन्त्यपूर्णानन्दकविग्रहम् ।।**

**नृपञ्चास्यमहं वन्दे श्रीविष्णुस्वामिसंमतम् ॥ इति ।**

खंड ४४ मध्ये

**काश्यादिसर्वलिङ्गेभ्यो रसलिङ्गार्चनाच्छिवः ।**

**प्राप्यते येन तल्लिङ्गं भोगारोग्यामृतप्रदम् ॥ इति ।**

खंड ४५ मध्ये-

**प्रमादाद्रसनिन्दायाः श्रुतावेनं स्मरेत्सुधीः ।**

**द्राक्त्यजेन्निन्दकं नित्यं निन्दया पूरिताशुभम् ।।**

खंड ५० मध्ये-

**यः स्यात्प्रावरणाविमोचनधियां साध्यः प्रकृत्या पुनः**

**संपन्नः सह तेन दीव्यति परं वैश्वानरे जाग्रति ।**

**ज्ञातो यद्यपरं न वेदयति च स्वस्मात्स्वयं द्योतते**

**यो ब्रह्मेव स दैन्यसंसृतिभयात्पायादसौ पारदः ॥ इति ।**

अशा प्रकारे हे रसेश्वरदर्शनातील उद्धृत १२ श्लोक आहेत ज्यांचे मूळ संदर्भ उपलब्ध होऊ शकले नाहीत.

**रसेश्वरदर्शन विभागणी-**

रसेश्वरदर्शनाची संहिता सिद्ध करत करत भाषांतर आणि शब्दार्थ सहजपणे कळावेत यादृष्टीने खंडशः विभागणी केली आहे. येथे

एकूण ५१ खंड केले आहे. विषयानुसार खंडांना स्वतंत्र क्रम न देता सलग दिले आहेत. येथे पुढीलप्रमाणे विषयविभागणी केली आहे-

१)पारदमहत्त्व २) जीवन्मुक्त ३) मूर्च्छित, मृत व बद्ध पारद ४) पारदाचे अठरा संस्कार ५) देहवेध ६) मुक्तीसाठी देहवेध आवश्यक ७) जीवन्मुक्तीची उपपन्नता ८) रसमाहात्म्य, रसलिंगपूजा ९) रसनिंदेत दोष १०) दिव्य देहाने ब्रह्मत्वप्राप्ती ११) रसाचे ब्रह्माशी साम्य

**रसेश्वरदर्शन विषयवस्तू-**

रसेश्वरदर्शन हे शेवटचे शैव दर्शन मानले जाते. ह्या दर्शनात ‘ रस ’ ह्या शब्दाचा अर्थ पारा. पाऱ्यावर करावयाच्या वेगवेगळ्या प्रकियांच्या द्वारा होणाऱ्या दिव्यदेहप्राप्तीवर येथे भर दिला आहे. पारा किंवा पारद जीवाला संसाराच्या पलीकडच्या तीरावर नेऊन पोहोचवितो. संसाराच्या पलीकडचा पार तो देतो म्हणून तो पार-द. शरीराला स्थिरता प्राप्त झाली, तर जीवन्मुक्ती प्राप्त होईल आणि ही स्थिरता देण्याचा उपाय पारा वा पारद हा होय. जीव जीवन्मुक्त झाला, तरच तो ईश्वरस्वरूप होऊ शकतो. ह्या दर्शनानुसार जीवन्मुक्ती म्हणजे अजरामर होणे. जरा, व्याधी, मृत्यू यांपासून देह मुक्त हवा. त्यासाठी पारदाचा उपयोग आवश्यक आहे.

पारदाप्रमाणेच अभ्रकही महत्त्वाचे. पारद महेश्वराच्या बीजापासून निष्पन्न होतो, तर अभ्रक हे गौरीच्या बीजापासून निष्पन्न होते. ह्या दोहोंच्या योग्य उपयोगाने दिव्यदेह प्राप्त होतो. पाण्याच्या सिद्धीचा विधी करताना त्यावर स्वेदन, मर्दन, मूर्च्छन, स्थापन, पातन इ. अठरा

प्रकारचे संस्कार करणे आवश्यक असते. त्यामुळे विविध सिद्धी पाप्त होतात. रसाचे ब्रह्माशी साम्य आहे रस म्हणजेच  परब्रह्म असेही ह्या दर्शनात मानले आहे.

रसेश्वरदर्शन हा असा एक ग्रंथ आहे, जो विद्यापीठ स्तरावरील महाविद्यालये आणि आयुर्वेद महाविद्यालये या दोन्ही ठिकाणी अभ्यासला जातो. या ग्रंथाचे संपादन, शब्दार्थासह अनुवाद करताना एक गोष्ट प्रकर्षाने जाणविली की या ग्रंथास मराठी व्याख्यान करण्याची नितांत आवश्यकता आहे. कारण यातील अनेक आयुर्वेदिक संकल्पना महाविद्यालायीन विद्यार्थ्यांसाठी नवीन आहेत किंबहुना काही संकल्पना तर अज्ञात आहेत, तर येथील जीवन्मुक्त, मुक्तीचे सिद्धान्त, दार्शनिक सिद्धान्त आयुर्वेदिक विद्यार्थ्यांसाठी नवीन आहेत. म्हणून उभयतांना मार्गदर्शक ठरेल असे लवरकरच मराठीतून व्याख्या करण्याचा संकल्प करून येथे विराम घेतो.

**eBook Publication Pvt. Ltd. मुंबई** यांचे मी अत्यंत आभार मानतो त्यांनी **रसेश्वरदर्शन** या पुस्तकाचे प्रकाशन करण्याचे ठरवून हा अनमोल भारतीय तत्त्वज्ञान आणि आयुर्वेद विज्ञानाचा खजिना जनसामान्यांसमोर **ebook** स्वरूपात खुला करत आहेत. सर्व ज्ञात-अज्ञात व्यक्तींचे ऋण व्यक्त करून या ग्रंथाचे स्वागत होईल असा विश्वास रस एव ब्रह्मरूप परम परमेश्वर त्या रामेश्वर चरणी ग्रंथ समर्पित करतो.

**डॉ.नीलेश जोशी**

**चैत्र-शुक्ल-प्रतिपदा, ३१ मार्च २०१७**

|| श्री ||

श्रीमत्सायणमाधवाचार्यप्रणीत

सर्वदर्शनसङ्ग्रहान्तर्गत

# रसेश्वरदर्शन

मूळ संस्कृत संहिता, शब्दार्थ आणि मराठी भाषांतर

# रसेश्वरदर्शन (शैवसंप्रदाय-४)

## १.पारदमहत्त्व

### खंड १

**अपरे माहेश्वराः परमेश्वरतादात्म्यवादिनोऽपि पिण्डस्थैर्ये सर्वाभिमता जीवन्मुक्तिः सेत्स्यतीत्यास्थाय पिण्डस्थैर्योपायं पारदादिपदवेदनीयं रसमेव संगिरन्ते ।**

==================

**पदार्थ** -

**अपरे**- अन्य, **माहेश्वराः**- महेश्वरभक्त (शैव), **परमेश्वरतादात्म्यवादिनो** - जीवात्म्याचे परमेश्वराशी तादात्म्य आहे हे मान्य करीत, **अपि** - असले तरी, **पिण्डस्थैर्ये** - शरीराला स्थिरता, **सर्वाभिमता** - सर्वांना अभिमत असलेली, **जीवन्मुक्तिः** - जीवन्मुक्ती, **सेत्स्यति** - सिद्ध होईल, **इति** - असे, **आस्थाय**- मानून, **पिण्डस्थैर्योपायं** - शरीर स्थिर करण्याचा उपाय, **पारदादिपदवेदनीयं** - पारद आदी शब्दांनी ओळखला जाणारा, **रसमेव** - रस हाच, **संगिरन्ते**- म्हणतात.

===============

**अनुवाद** -

अन्य महेश्वरभक्त (शैव) जीवात्म्याचे परमेश्वराशी तादात्म्य आहे हे मान्य करीत असले तरी शरीराला स्थिरता प्राप्त झाली तर सर्वांना अभिमत असलेली जीवन्मुक्ती सिद्ध होईल ह्या मताचा अवलंब करून शरीर स्थिर करण्याचा उपाय पारद इत्यादी शब्दांनी ओळखला जाणारा रस हाच [होय] असे म्हणतात.

==============

## खंड २

**रसस्य पारदत्वं संसारपरपारप्रापणहेतुत्वेन ।**

**तदुक्तम् -**

**संसारस्य परं पारं दत्तेऽसौ पारदः स्मृतः ॥ इति ।र.रत्ना.३.१.६॥**[31]

==============

**पदार्थ-**

**रसस्य** – रसाचे, **पारदत्वं** - पारदत्व, **संसारपरपारप्रापणहेतुत्वेन** - संसाराच्या पलीकडच्या तीरावर नेऊन पोचवितो त्यामुळे, **तदुक्तम्** - म्हटलेच आहे, **संसारस्य** - संसाराच्या, **परं** - पलीकडचा, **पारं** - पार, तीर, **दत्ते** - देतो, **असौ-** हा, **पारदः** - पारद, **स्मृतः** - ओळखला जातो.

---

[31] (Krishnadas, 1966), रसरत्नाकर, . Mumbai: Kshemraj Krishnadas.

==============

**अनुवाद-**

संसाराच्या पलीकडच्या तीरावर नेऊन पोचवितो त्यामुळे रसाचे पारदत्व (स्वयंसिद्‌ध आहे).

म्हटलेच आहे -

'संसाराच्या पलीकडचा पार, तीर देतो (तो) हा पार-द (म्हणून) ओळखला जातो.

==============

पुढील खंडात रसार्णव ग्रंथातील पारद शब्दाची व्युत्पत्ती देऊन पारदाचे महत्त्व स्पष्ट करीत आहेत.

==============

## खंड ३

**रसार्णवेऽपि -**

**पारदो गदितो यस्मात्परार्थं साधकोत्तमैः ।। र.अ.१.३५ ।।**

================

**पदार्थ-**

**रसार्णवे** - रसार्णव ग्रंथात, **अपि** - सुद्‌धा,

**साधकोत्तमैः** - श्रेष्ठ साधकांनी, **परार्थम्-** परप्राप्तीसाठी, **यस्मात्-** म्हणून **पारदो-** पारद, **गदितो-** म्हटले आहे.

=================

**अनुवाद-**

रसार्णव ग्रंथात सुद्धा (म्हटले आहे) -

श्रेष्ठ साधकांनी परप्राप्तीसाठी (रसाचा उपयोग होतो) म्हणून (याला) पारद असे म्हटले आहे.

=================

पुढील खंडात पारदाला ‘सूत’ आणि ‘रस’ का म्हटले आहे याविषयी रसार्णव ग्रंथातील श्लोक देतात.

===============

## खंड ४

**सुप्तोऽयं मत्समो देवि मम प्रत्यङ्गसंभवः ।**

**मम देहरसो यस्माद्रसस्तेनायमुच्यते ॥ इति ।र.अ.१.३६ ।।**

================

**पदार्थ-**

**देवि-** हे देवि, **मम-** माझ्या, **प्रत्यङ्गसंभवः-** प्रत्यंगातून उत्पन्न झालेला, **अयम्** - हा, **सुप्तः-** सुप्तावस्थेत, **मत्समो** - माझ्यासारखाच, **यस्मात्-** ज्याअर्थी, **मम-** माझ्या, **देहरसो-** देहाचा रस, **तेन** - त्याअर्थी, **अयम्-** हा, **रसः-** रस, **उच्यते-** म्हंटला जातो/ ओळखला जातो.

==============

**अनुवाद-**

हे देवि, माझ्या प्रत्यंगातन उत्पन्न झालेला हा (रस) सुप्तावस्थेत माझ्यासारखाच आहे. ज्याअर्थी हा माझ्या देहाचा रस आहे, त्याअर्थी हा रस (म्हणून) ओळखला जातो.

===============

यापुढील खंडात देहपात व जीवन्मुक्ती यावर खंडन-मंडनात्मक चर्चा आहे.

===============

## खंड ५

**(आक्षेपभाष्यम्)**

**ननु प्रकारान्तरेणापि जीवन्मुक्तियुक्तौ नेयं वाचोयुक्तियुक्तिमतीति**

**(समाधानभाष्यम्)**

**चेत्, न, षट्स्वपि दर्शनेषु देहपातानन्तरं मुक्तेरुक्ततया तत्र विश्वासानुपपत्त्या निर्विचिकित्सप्रवृत्तेरनुपपत्तेः ।**

=================

**पदार्थ-**

**ननु -** खरोखर, **प्रकारान्तरेण अपि-** अन्य प्रकाराने सुद्धा, **जीवन्मुक्तियुक्तौ -** जीवन्मुक्ती साध्य होत असल्यामुळे, **इयम्-**ही, **वाचोयुक्तियुक्तिमति इति -** तुमचा युक्तिवाद युक्तिसंगत, **न -** नाही**,**

**चेत् न-** तर तसे नाही**, षट्सु अपि-** सहाही, **दर्शनेषु-** दर्शनात, **देहपातानन्तरं-** मृत्यूनंतर, **मुक्तेः-** मुक्तीचे, **उक्ततया-** प्रतिपादन केलेले असल्यामुळे, **तत्र-** तेथे, तिच्यावर, **विश्वासानुपपत्त्या-** विश्वास ठेवणे उपपन्न होत नसल्यामुळे, **निर्विचिकित्सप्रवृत्तेः-** चिकित्सारहित बुद्धीने प्रवृत्त होणे, **अनुपपत्तेः -** उपपन्न होत नसल्यामुळे.

================

**अनुवाद-**

**(आक्षेपभाष्य)**

(रसाखेरीज) अन्य प्रकाराने सुद्धा जीवन्मुक्ती साध्य होत असल्यामुळे हा तुमचा युक्तिवाद युक्तिसंगत नाही,

**(समाधानभाष्य)**

तर तसे नाही; कारण, सहाही दर्शनात मृत्यूनंतर मुक्तीचे प्रतिपादन केलेले असल्यामुळे उपपन्न होत नसल्यामुळे (आणि) चिकित्सारहित बुद्धीने प्रवृत्त होणे उपपन्न होत नसल्यामुळे (अन्य प्रकाराने सुद्धा जीवन्मुक्ती साध्य होत इ.. योग्य नाही).

================

आता पिंडधारणेचा उपाय म्हणून रस आणि रसायन यांच्या प्रयोगाचे विधान पुढील रसार्णव ग्रंथातील प्रमाणाने सिद्ध करीत आहेत.

===================

## खंड ६

**तदप्युक्तं तत्रैव**

**षड्दर्शनेऽपि मुक्तिस्तु दर्शिता पिण्डपातने। र.अ.१.१२**

**करामलकवत्सापि प्रत्यक्षा नोपलभ्यते ।। र.अ.१.१३**

**तस्मात्तं रक्षयेत्पिण्डं रसैश्चैव रसायनैः ॥ र.अ.१.११**

==================

**पदार्थ-**

**तदप्युक्तं** - ते सुद्धा, **तत्रैव**- त्याच ठिकाणी,

**षड्दर्शनेऽपि**- सहा दर्शनांमध्ये, **पिण्डपातने-** शरीरपातानंतर, **मुक्तिः**- मुक्ती, **दर्शिता**- दाखविली आहे, **सापि**- ती मुक्ती सुद्‌धा, **करामलकवत्-** हातात असलेल्या आवळ्यासारखी, **प्रत्यक्षा-** प्रत्यक्षपणे, **नोपलभ्यते-** उपलब्ध होत नाही, **तस्माद्**- म्हणून, **रसैः**- रस, **च** - आणि, **रसायनैः-** रसायने यांच्या साहाय्याने, **पिण्डम्**- शरीराचे, **रक्षेत्**- रक्षण करावे.

================

**अनुवाद-**

ते सुद्‌धा त्याच ठिकाणी सांगितले आहे -

परंतु सहा दर्शनांमध्ये शरीरपातानंतर मुक्ती असे दाखविले आहे. ती मुक्ती सुद्‌धा हातात असलेल्या आवळ्यासारखी प्रत्यक्षपणे उपलब्ध होत नाही. म्हणून (प्रत्यक्ष उपलब्ध होणाऱ्या जीवन्मुक्तीसाठी) रस आणि रसायने यांच्या साहाय्याने शरीराचे रक्षण करावे.

===============

जीवन्मुक्ताच्या बाबतीतच ते शक्य आहे म्हणून जीवन्मुक्तीवर आणि ती प्राप्त व्हावी यासाठी शरीरस्थैर्यावर त्यांचा भर आहे. म्हणून पुढील खंडात रसहृदयतंत्रातील प्रमाण देत आहेत.

===============

## खंड ७

**गोविन्दभगवत्पादाचार्यैरपि**

**इति धनशरीरभोगान्मत्वानित्यान् सदैव यतनीयम् ।**

**मुक्तौ सा च ज्ञानात्तच्चाभ्यासात्स च स्थिरे देहे ॥ र.हृ.१.१० ॥**

=================

**पदार्थ-**

**गोविन्दभगवत्पादाचार्यैरपि -** पूज्य आचार्य गोविंदपादांनी सुद्धा, इति- याप्रमाणे, **धनशरीरभोगान् -** धन, शरीर व भोग, **अनित्यान्-** अनित्य, **मत्वा-** मानून, जाणून, **सदैव-** नेहमी, **मुक्तौ-** मुक्तीसाठी, **यतनीयम्-** प्रयत्न करावा, **च-** आणि, **सा-** ती, **ज्ञानात्-** ज्ञानाने, **तत्-** ते (ज्ञान), **अभ्यासात्-** अभ्यासाने, **च** - आणि, **सः** - तो (अभ्यास), **देहे-** देह, **स्थिरे-** स्थिर [**सति-**असेल, **चेत्-**तर, **शक्यते-** होऊ शकतो]

================

**अनुवाद-**

पूज्य आचार्य गोविंदपादाचार्यांनी सुद्धा म्हटले आहे,

याप्रमाणे धन, शरीर व भोग हे अनित्य आहेत असे जाणून नेहमी मुक्तीसाठी प्रयत्न करावा. आणि ती मुक्ती ज्ञानाने प्राप्त होते, ते (ज्ञान)

सतत अभ्यासाने प्राप्त होते, आणि तो (अभ्यास) देह स्थिर (असेल तरच होऊ शकतो.)

===============

पुढील खंडात पुन्हा एकदा पूर्वपक्ष सिद्धान्तपक्षाच्या देहपाताविना जीवन्मुक्ती या विषयी आक्षेप नोंदवला आणि त्याचे प्रमाण मागितले आहे.

==================

## खंड ८

**(आक्षेपभाष्यम्)**

**ननु विनश्वरतया दृश्यमानस्य देहस्य कथं नित्यत्वमवसीयत इति चेत्,**

**(समाधानभाष्यम्)**

**मैवं मंस्थाः । षाट्कौशिकस्य शरीरस्यानित्यत्वेऽपि रसाभ्रकपदाभिलप्यहरगौरीसृष्टिजातस्य नित्यत्वोपपत्तेः ।**

===============

**पदार्थ-**

**ननु**- खरोखर, **दृश्यमानस्य-** दिसणाऱ्या, **देहस्य-** देहाचे, **विनश्वरतया-** नश्वर असताना, **नित्यत्वम्-** नित्यत्व, **कथम्-** कसे काय, **अवसीयत**- निर्धारित करता, **इति**-असे, **चेत्-** तर,

**एवं** - तसे, **मा मंस्थाः**- समजू नका, **षाट्कौशिकस्य-** सहा कोशांनी बनलेले, **शरीरस्य**- शरीर, **अनित्यत्वे अपि**- अनित्य असले तरी, **रसाभ्रकपदाभिलप्य-** रस आणि अभ्रक अशी नावे असलेल्या, **हरगौरीसृष्टिजातस्य-** शिव आणि पार्वती यांच्यापासून निर्माण झालेल्या पदार्थांनी उत्पन्न केलेले, **नित्यत्वोपपत्तेः-** (शरीराच्या) नित्यत्वाची उपपत्ती लावता येत असल्यामुळे.

==============

**अनुवाद-**

**(आक्षेपभाष्य)**

दिसणाऱ्या देहाची नश्वरता स्पष्ट असताना त्याचे नित्यत्व कसे काय निर्धारित करता ?

**(समाधानभाष्य)**

तसे समजू नका. कारण, सहा कोशांनी बनलेले शरीर अनित्य असले तरी रस आणि अभ्रक अशी नावे असलेल्या, शिव आणि पार्वती यांच्यापासून निर्माण झालेल्या दोन पदार्थांनी उत्पन्न केलेले शरीर नित्य होते अशी उपपत्ती लावता असल्यामुळे (शरीर नित्यत्व सिद्ध करता येते).

==================

आता हर व गौरी यांच्यापासून निर्मित रस व अभ्रक यांच्या योगाने कोणतेही षाट्कौशिक शरीरदेखील अमर, नित्य होते यास काही

प्रमाण आहे का याचे उत्तर म्हणून पुढील खंडात गोविंद भगवत्पादाचार्य यांच्या रसहृदयतंत्र ग्रंथाचे प्रमाण देत आहेत.

==========

## खंड ९

**तथा च रसहृदये -**

**ये चात्यक्तशरीरा हरगौरीसृष्टिजां तनुं प्राप्ताः ।**

**मुक्तास्ते रससिद्धा मन्त्रगणो किंकरो येषाम् ॥ र.हृ.१.७ ॥**

===============

**पदार्थ-**

**च-** आणि, **तथा-** त्याप्रमाणे, **रसहृदये-** रसहदयात,

**च**-आणि, **ये-** जे, **अत्यक्तशरीरा-** शरीराचा त्याग न करताच, **हरगौरीसृष्टिजां-** हर व गौरी यांच्या निर्मितींनी उत्पन्न, **तनुं-** शरीर, **प्राप्ताः-** प्राप्त झालेले, **ते-** ते, **रससिद्धा-** रसाने सिद्ध झालेले, **मुक्ताः-** मुक्त, **येषाम् - ज्यांचा, मन्त्रगणो-** मंत्रांचा अर्थ समूह, **किंकरो-** दास.

==============

**अनुवाद-**

आणि त्याप्रमाणे रसहदयात म्हटले आहे-

आणि जे शरीराचा त्याग न करताच हर व गौरी यांच्या (रस आणि अभ्रक) निर्मितींनी उत्पन्न झालेले शरीर प्राप्त केलेले, ते रसाने सिद्ध झालेले मुक्त पुरुष (असून) ज्यांचा मंत्रांचा अर्थ समूह दास होय.

===============

## खंड १०

**तस्माज्जीवन्मुक्ति समोहमानेन योगिना प्रथमं दिव्यतनुविधेया। हरगौरीसृष्टिसंयोगजनितत्वं च रसस्य हरजत्वेनाभ्रकस्य गौरीसंभवत्वेन तत्तदात्मकत्वमुक्तम् -**

**अभ्रकस्तव बीजं तु मम बीजं तु पारदः ।**

**अनयोर्मेलनं देवि मृत्युदारिद्रयनाशनम् ॥ इति ।**[32]

===============

**पदार्थ-**

**तस्मात्**- म्हणून, **जीवन्मुक्ति-** जीवन्मुक्तीची, **समोहमानेन-** अभिलाषा असणाऱ्या, **योगिना-** योग्याने, **प्रथमं-** प्रथम, **दिव्यतनुविधेया-** आपले शरीर दिव्य बनवावे, **रसस्य-** रसाची, **हरजत्वेन-** शिवापासून उत्पन्न झालेले, **च**-आणि, **अभ्रकस्य**- अभ्रक, **गौरीसंभवत्वेन-** गौरीपासून उत्पन्न झाले असल्यामुळे, **हरगौरीसृष्टिसंयोगजनितत्वं-** हर-गौरी यांच्या

---

32 Dr. Ray P.C. History of Hindu Chemistry, pg.lxxii

निर्मितींच्या संयोगापासून (शरीराचे) उत्पन्नत्व, **तत्तदात्मकत्वमुक्तम्-** त्या दोन निर्मितींनीच बनलेले असणे असे सांगितले आहे,

**देवि-** हे देवि, **अभ्रकः-** अभ्रक, **तव-** तुझे, **बीजम्-** बीज, **तु-** तर, **पारदः-** पारद, **मम-** माझे, **बीजम्-** बीज, **अनयोः** - या दोहोंचे, **मेलनम्-** मिलन, एकत्र येण्याने, **मृत्युदारिद्रयनाशनम्-** मृत्यु आणि दारिद्य यांचा नाश,

==============

**अनुवाद-**

म्हणून ज्याला जीवन्मुक्तीची अभिलाषा आहे अशा योग्याने प्रथम आपले शरीर दिव्य बनवावे. रस शिवापासून आणि अभ्रक गौरीपासून उत्पन्न झाले असल्यामुळे.

हर-गौरी यांच्या निर्मितींच्या संयोगापासून (शरीराचे) उत्पन्नत्व म्हणजे (शरीर) त्या दोन निर्मितींनीच बनलेले असणे असे सांगितले आहे-

'हे देवि, अभ्रक हे तुझे बीज आणि पारद हे माझे बीज. ह्या दोघांच्या एकत्र येण्याने मृत्यु आणि दारिद्य यांचा नाश होतो.

==============

पुढील खंडामध्ये रससिद्ध, जीवन्मुक्त कोण कोण झाले आहेत यांचे सविस्तर वर्णन केले जाईल.

=======================

## २.जीवन्मुक्त

### खंड ११

**अत्यल्पमिदमुच्यते। देवदैत्यमुनिमानवादिषु बहवो रससामर्थ्यादिव्यं देहमाश्रित्य जीवन्मुक्तिमाश्रिताः श्रूयन्ते रसेश्वरसिद्धान्ते**

===============

**पदार्थ-**

**अत्यल्पम्-** अगदी थोडे, **इदम्-** हे, **उच्यते-** सांगितले आहे, **देवदैत्यमुनिमानवादिषु-** देव, दैत्य, मुनी, मानव इत्यादीपैकी, **बहवो-** अनेकांनी, **रससामर्थ्याद्-** रसाच्या सामर्थ्याने, **दिव्यं-** दिव्य, **देहम्-** देह, **आश्रित्य-** प्राप्त करून, **जीवन्मुक्तिम्-** जीवन्मुक्ताची स्थिती, **आश्रिताः-** प्राप्त करून घेतली, **रसेश्वरसिद्धान्ते-** रसेश्वरसिद्धान्त ग्रंथात, **श्रूयन्ते-** ऐकले आहे,

==============

**अनुवाद-**

हे आम्ही अगदी थोडे असेच सांगितले आहे. की देव, दैत्य, मुनी, मानव इत्यादीपैकी अनेकांनी रसाच्या सामर्थ्याने दिव्य देह प्राप्त करून जीवन्मुक्ताची स्थिती प्राप्त करून घेतली. रसेश्वरसिद्धान्त ग्रंथात म्हटले आहे-

================

पुढील खंडात रससिद्धांची जीवन्मुक्ती लाभलेल्या देव, दैत्य, मनुष्य इत्यादींची नावे सांगत आहेत.

================

## खंड १२

**देवाः केचिन् महेशाद्या दैत्याः काव्यपुरःसराः ।**

**मुनयो वालखिल्याद्या नृपाः सोमेश्वरादयः ॥**

================

**पदार्थ-**

**महेशाद्या-** 'महेश आदी, **केचित्-** काही, देवाः- देव, **काव्यपुरःसराः-** शुक्राचार्यप्रभृती, **दैत्याः-** दैत्य, **वालखिल्याद्या-** वालखिल्य आदी, **मुनयो-** मुनी, **सोमेश्वरादयः-** सोमेश्वरप्रभृती, **नृपाः-** राजे,

===============

**अनुवाद-**

'महेश आदी काही देव, शुक्राचार्य प्रभृती दैत्य, वालखिल्य आदी मुनी, सोमेश्वरप्रभृती राजे,

=====================

## खंड १३

**गोविन्दभगवत्पादाचार्यो गोविन्दनायकः ।**

**चर्वटिः कपिलो व्यालिः कापालि: कन्दलायनः ।।**

===============

**पदार्थ-**

**गोविन्दभगवत्पादाचार्यो-** पूज्यपाद आचार्य गोविंद, **गोविन्दनायकः-** गोविंदनायक, **चर्वटिः-** चर्वटि, **कपिलो-** कपिल, **व्यालिः-** व्यालि, **कापालि:-** कापालि, **कन्दलायनः-** कंदलायन

==============

**अनुवाद-**

पूज्यपाद आचार्य गोविंद, गोविंदनायक, चर्वटि, कपिल, व्यालि, कापालि, कंदलायन

================

## खंड १४

**एतेऽन्ये बहवः सिद्धा जीवन्मुक्ताश्चरन्ति हि।**

**तनुं रसमयीं प्राप्य तदात्मककथाचणाः ॥ इति ।**

===============

**पदार्थ-**

**एते-** हे, **हि-**तसेच, **अन्ये-** दुसरे, **बहवः-** पुष्कळ, **रसमयीं-** रसमय, **तनुं-** शरीर, **प्राप्य-** प्राप्त करून, **सिद्धा-** (रसाने) सिद्ध झालेले, **जीवन्मुक्ताः-** जीवन्मुक्त, **तदात्मककथाचणाः-** त्याविषयीच्या कथा प्रसिद्ध होऊन, **चरन्ति-** संचार करीत आहेत.

==============

**अनुवाद-**

हे तसेच दुसरे पुष्कळ रसमय शरीर प्राप्त करून (रसाने) सिद्ध झालेले, जीवन्मुक्त (झाले आहेत) आणि त्याविषयीच्या कथा प्रसिद्ध होऊन संचार करीत आहेत.

================

पुढील खंडात कर्मयोग हा दोन प्रकारचा असून त्याचे विवेचन करणारे रसार्णव ग्रंथातील श्लोक प्रमाण म्हणून उद्धृत करीत आहेत.

================

## खंड १५

**अयमेवार्थः परमेश्वरेण परमेश्वरीं प्रति प्रपञ्चितः -**

**कर्मयोगेण देवेशि प्राप्यते पिण्डधारणम् ।**

**रसश्च पवनश्चेति कर्मयोगो द्विधा स्मृतः ॥ र.अ.१.१८ ॥**

===============

**पदार्थ-**

**अयम् एव**- हाच, **अर्थः**- अर्थ, **परमेश्वरेण-** परमेश्वर शिवाने, **परमेश्वरीं प्रति-** परमेश्वरी पार्वतीला, **प्रपञ्चितः-** समजावून दिला आहे,

**देवेशि-** देवाचे अधिराज्ञि, **कर्मयोगेण-** कर्मयोगाच्या द्वारा, **पिण्डधारणम्-** शरीराची स्थिर धारणा, **प्राप्यते-** प्राप्त होते, **रसः**- रस, **च**- आणि, **पवनः**- प्राणवायू, **द्विधा**- दोन प्रकारचा, **कर्मयोगो-** कर्मयोग, **स्मृतः-** समजावा.

==============

**अनुवाद-**

आणि हाच अर्थ परमेश्वर शिवाने परमेश्वरी पार्वतीला सविस्तर समजावून दिला आहे-

हे देवाचे अधिराज्ञि, कर्मयोगाच्या द्वारे शरीराची स्थिर धारणा प्राप्त होते. रस आणि प्राणवायु दोन प्रकारचा कर्मयोग समजावा.

===============

पुढील खंडामध्ये **मूर्च्छित, मृत, बद्ध** या तीन अवस्था **पारा** आणि **पवन** म्हणजे **प्राणावायू** या दोहोमध्ये कशा प्रकारे लागू होतात ते सांगत आहेत.

============

## खंड १६

**मूर्च्छितो हरति व्याधीन्मृतो जीवयति स्वयम् ।**

**बद्धः खेचरतां कुर्याद्रसो वायुश्च भैरवि ॥ इति ।र.अ.१.१९॥**

===============

**पदार्थ-**

**भैरवि-** हे भैरवि, **रसः**- रस, **च**- आणि, **वायुः**- प्राणवायू, **मूर्च्छितो-** मूर्च्छित, **व्याधीन्-** व्याधी, **हरति-** दूर करतात, **मृतो**- मृत, **स्वयम्-** स्वतः, **जीवयति-** जिवंत करतात, **बद्धः-** बद्ध, **खेचरतां-** आकाशात भ्रमण करण्याचे सामर्थ्य, **कुर्यात्-** करतील, देतील.

==============

**अनुवाद-**

हे भैरवि, रस आणि प्राणवायु हे मूछित झाले म्हणजे व्याधी दूर करतात, मृत झाले म्हणजे (प्राण्यांना) जिवंत करतात आणि ते बद्ध झाले म्हणजे आकाशात भ्रमण करण्याचे सामर्थ्य देतात.

=====================

या पुढील खंडात पारदाच्या तीन अवस्था त्यांचे वर्णन करीत आहेत.

=====================

# ३.मूर्च्छित, मृत व बद्ध पारद

## खंड १७

### १.मूर्च्छित पारद

**मूर्च्छितस्वरूपमुक्तम् -**

**नानावर्णो भवेत्सूतो विहाय घनचापलम् ।**

**लक्षणं दृश्यते यस्य मूर्च्छितं तं वदन्ति हि ॥**

================

**पदार्थ-**

**मूर्च्छितस्वरूपम्**- मूर्च्छित पाऱ्याचे स्वरूप, **उक्तम्**- सांगितले आहे,

**घनचापलम्-** घनत्व आणि चंचलता, **विहाय-** रहित, **नानावर्णो-** विविध रंग, **सूतः**-पारा, **भवेत्-** असेल, **यस्य-** ज्याचे, **लक्षणम्-** लक्षण, **तं-** त्याला, **मूर्च्छितं-** मूर्च्छित पारा, **वदन्ति-** म्हणतात.

===============

**अनुवाद-**

मूर्च्छित पाऱ्याचे स्वरूप पुढीलप्रमाणे सांगितले आहे-

घनत्व आणि चंचलता यांनी रहित होऊन विविध रंग दृग्गोचर होतात असे ज्या पायाचे लक्षण (आहे), त्याला पारा मूच्छित असे म्हणतात.

===============

पुढील खंडात मृत या पारदाच्या दुसऱ्या अवस्थेचे वर्णन करतात.

===========

## खंड १८

## २.मृत पारद

**आर्द्रत्वं च घनत्वं च तेजो गौरवचापलम् ।**

**यस्यैतानि न दृश्यन्ते तं विद्यान्मृतसूतकम् ॥ र.अ.११.२००॥**

================

**पदार्थ-**

**आर्द्रत्वं-** ओलसरपणा, **घनत्वं-** दाटपणा, **तेजो-** तेज, **गौरवचापलम्-** वजनदारपणा आणि चंचलता, **एतानि-** हे, **यस्य-** ज्याचे ठिकाणी, **न दृश्यन्ते-** दिसून येत नाहीत, **तम्-** त्याला, **मृतसूतकम्-** मृत पारा, **विद्यात्-** समजावे.

===============

**अनुवाद-**

ओलसरपणा, दाटपणा, तेज, वजनदारपणा आणि चंचलता हे गुण ज्याच्या ठिकाणी दिसून येत नाहीत; त्याला मृत पारा असे समजावे.

================

यापुढील खंडात पाऱ्याची तिसरी अवस्था बद्ध तिचे वर्णन करत आहेत.

=============

## खंड १९

### ३.बद्ध पारद

**अन्यत्र बद्धस्वरूपमप्यभ्यधायि-**

**अक्षतश्च लघुद्रावी तेजस्वी निर्मलो गुरुः ।**

**स्फोटनं पुनरावृत्तौ बद्धसूतस्य लक्षणम् ॥ इति ।**

===============

**पदार्थ-**

**अन्यत्र-** इतरत्र, **बद्धस्वरूपम्-** बद्ध पाऱ्याचे स्वरूप, **अपि-** सुद्धा, **अभ्यधायि-** सांगितले आहे,

**अक्षतः-** जो क्षत झालेला नाही, **लघुद्रावी-** थोडा द्रवणशील, **तेजस्वी-** तेजस्वी, **निर्मलो-** स्वच्छ, च- आणि, **गुरुः-** वजनदार, **पुनरावृत्तौ-**

पुन्हा संस्कार होताना, **स्फोटनं-** स्फोट पावणे, **बद्धसूतस्य-** बद्ध पाऱ्याचे, **लक्षणम्-** लक्षण.

==============

**अनुवाद-**

इतरत्र बद्ध पाऱ्याचे स्वरूप सुद्धा सांगितले आहे -

जो क्षत झालेला नाही, थोडा द्रवणशील, तेजस्वी, स्वच्छ आणि वजनदार, आणि पुन्हा संस्कार होताना स्फोट पावणे (असे) बद्ध पाऱ्याचे लक्षण (आहे).

================

# ४.पारदाचे अठरा संस्कार

## खंड २०

**ननु हरगौरीसृष्टिसिद्धौ पिण्डस्थैर्यमास्थातुं पार्यते, तत्सिद्धिरेव कथमिति चेत्, न, अष्टादशसंस्कारवशात्तदुपपत्तेः ।**

===============

**पदार्थ-**

**ननु-** खरोखर**, हरगौरीसृष्टिसिद्धौ-** हर आणि गौरी यांच्या निर्मिती सिद्ध झाल्या असता, **पिण्डस्थैर्यम्-** शरीरास स्थिरता, **आस्थातुं-** प्राप्त करणे, **पार्यते-** शक्य होते,

**चेत्**-परंतु, **कथम्**- कशा बरे, **तत्सिद्धिरेव-** त्या सिद्ध करवयाच्या, **इति**- असे, **न**- नाही, **अष्टादशसंस्कारवशात्तदुपपत्तेः-** अठरा संस्कारांच्या उपयोगाने त्या सिद्ध होत असल्यामुळे.

==============

**अनुवाद-**

हर आणि गौरी यांच्या (रस आणि अभ्रक ह्या) निर्मिती सिद्ध झाल्या असता शरीरास स्थिरता प्राप्त करणे शक्य होते, परंतु त्या सिद्धच कशा करावयाच्या? तर (ते अवघड) नाही; अठरा संस्कारांच्या उपयोगाने त्या सिद्ध होत असल्यामुळे.

===================

## खंड २१

**तदुक्तमाचार्यैः**

**तस्य प्रसाधनविधौ सुधिया प्रतिकर्मनिर्मलाः प्रथमम् ।**

**अष्टादश संस्कारा विज्ञातव्याः प्रयत्नेन ॥ र.हृ.१.३४ ।**

===============

**पदार्थ-**

**तदुक्तम्-** तसे सांगितले आहे, **आचार्यैः -** आचार्यांनी

**तस्य-** त्याच्या, पाऱ्याच्या, **प्रसाधनविधौ-** सिद्धीच्या विधीच्या संबंधात, **सुधिया-** सुज्ञ साधकाने, **प्रथमम्-** पहिल्यांदा, **प्रतिकर्मनिर्मलाः-** ज्यांच्यातील प्रत्येक कर्म शुद्ध असेल असे, **अष्टादश-** अठरा, **संस्कारा-** संस्कार, **प्रयत्नेन-** प्रयत्नपूर्वक, **विज्ञातव्याः-** जाणून घ्यावेत.

==============

**अनुवाद-**

आचार्यांनी तसे सांगितले आहे-

त्या पाऱ्याच्या सिद्धीच्या विधीच्या संबंधात सुज्ञ साधकाने प्रथम ज्यांच्यातील प्रत्येक कर्म शुद्ध असेल असे अठरा संस्कार प्रयत्नपूर्वक जाणून घ्यावेत.

====================

## खंड २२

**ते च संस्कारा निरूपिताः**

**स्वेदनमर्दनमूर्छनस्थापनपातननिरोधनियमाश्च ।**

**दीपनगमनग्रासप्रमाणमथ जारणविधानम् ॥ र.हृ.२.१ ।**

**गर्भद्रुतिबाह्यद्रुतिक्षारणसंरागसारणाश्चैव ।**

**क्रामणवेधौ भक्षणमष्टादशधेति रसकर्म ॥ र.हृ.२.२ ।**

===============

**पदार्थ-**

**च-** आणि, **ते-** त्या, **संस्कारा-** संस्कारांचे, **निरूपिताः-** निरूपण,

**स्वेदन-** स्वेदन, **मर्दन-** मर्दन, **मूर्छन-** मूर्छन**, स्थापन-** स्थापन**, पातन-** पातन, **निरोध-** निरोध**, नियम-** नियम, **दीपन-** दीपन, **गमन-** गमन, **ग्रासप्रमाणम्-** ग्रासप्रमाण, **जारणविधानम्-** जारणविधी, **गर्भद्रुति-** आंतर द्रुति, **बाह्यद्रुति-** बाह्यद्रुति, **क्षारण-**क्षारण, **संराग-**संराग, **सारण-** सारण, **क्रामण-**क्रामण, **वेधौ-**वेध, **भक्षणम्-**भक्षण, **इति-**असे, **अष्टादशधा-** अठरा प्रकारचे, **रसकर्म-** रस संस्कार.

==============

**अनुवाद-**

आणि त्या संस्कारांचे निरूपण पुढीलप्रमाणे केले आहे-

(१) स्वेदन, (२) मर्दन, (३) मूर्च्छन, (४) स्थापन, (५) पातन, (६) निरोध, (७) नियम, (८) दीपन, (९) गमन, (१०) ग्रासप्रमाण, (११) जारणविधी, (१२) आंतर आणि बाह्य द्रुति, (१३) क्षारण, (१४) संराग, (१५) सारण, (१६) क्रामण, (१७) वेध आणि (१८) भक्षण -

हे रसाचे अठरा प्रकारचे संस्कार होत.

======================

पुढील खंडात पारदाच्या अठरा संस्कारांचे सविस्तर वर्णन न करण्याचे कारण सांगतात.

======================

## खंड २३

**तत्प्रपञ्चस्तु गोविन्दभगवत्पादाचार्यसर्वज्ञरामेश्वरभट्टारकप्रभृतिभिः प्राचीनैराचार्यनिरूपित इति ग्रन्थभूयस्त्वभयादुदास्यते ।**

================

**पदार्थ-**

**तत्प्रपञ्चस्तु-** त्यांचे विस्तृत वर्णन, **गोविन्दभगवत्पादाचार्यसर्वज्ञरामेश्वरभट्टारकप्रभृतिभिः-** पूज्यपाद आचार्य गोविंद, सर्वज्ञ रामेश्वर भट्टारक इत्यादी, **प्राचीनैः-** प्राचीन, **आचार्यनिरूपित-** आचार्यांनी निरूपण केले आहे, **इति-** म्हणून, **ग्रन्थभूयस्त्वभयाद्-** ग्रंथविस्ताराच्या भीतीने, **उदास्यते-** उपेक्षा केली आहे.

===============

**अनुवाद-**

त्यांचे विस्तृत वर्णन पूज्यपाद आचार्य गोविंद, सर्वज्ञ रामेश्वर भट्टारक इत्यादी प्राचीन आचार्यांनी निरूपण केले आहे, म्हणून ग्रंथविस्ताराच्या भीतीने (मी त्याची) उपेक्षा केली आहे.

================

देहवेध हेच रसशास्त्राचे परम प्रयोजन आहे असे पुढील खंडात स्पष्ट करत आहेत.

====================

## ९.देहवेध

### खंड २४

**न च रसशास्त्रं धातुवादार्थमेवेति मन्तव्यम्, देहवेधद्वारा मुक्तेरेव परमप्रयोजनत्वात् ।**

===============

**पदार्थ-**

**च-** आणि, **रसशास्त्रं-** रसशास्त्र, **धातुवादार्थमेव-**धातूंचे वर्णन करण्यासाठीच, **इति-**असे**, न मन्तव्यम्-** समजू नये, **देहवेधद्वारा-** देहवेधाच्या द्वारे, **मुक्तेः-** मुक्ती, **एव-**हेच, **परमप्रयोजनत्वात्-** परम प्रयोजन.

==============

**अनुवाद-**

आणि रसशास्त्र केवळ (लोहादी) धातूंचे वर्णन करण्यासाठीच (आहे) असे समजू नये; (कारण) देहवेधाच्या द्वारे मुक्ती हेच त्या शास्त्राचे परम प्रयोजन (आहे).

================

**रसार्णव** ग्रंथातील श्लोक उद्धृत करून देहवेध प्रयोजानाची पुष्टी पुढील खंडात करतात.

===================

## खंड २५

**तदुक्तं रसार्णवे-**

**लोहवेधस्त्वया देव यदर्थमुपवर्णितः ।**

**तं देहवेधमाचक्ष्व येन स्यात्खेचरी गतिः ।। र.अ.१८.१ ||**

================

**पदार्थ-**

**रसार्णवे-** रसार्णवात, **तदुक्तम्-** ते सांगितले आहे,

**देव-** देवा, **लोहवेधः-** लोहाचा (लोखंडाचा) वेध, **त्वया-** तुम्ही, **यदर्थम्-** ज्याच्यासाठी, **उपवर्णितः-** वर्णन करून सांगितला, **तम्-**त्या, **देहवधम्-** देहाचा वेध, **आचक्ष्व-** सांगा, **येन-** ज्यामुळे, **खेचरी** आकाशात भ्रमण करण्याचे, **गतिः-** सामर्थ्य, **स्यात्- (**प्राप्त) होईल.

===============

**अनुवाद-**

रसार्णवात ते स्पष्टपणे सांगितले आहे-

हे देवा, हा लोहाचा (लोखंडाचा) वेध तुम्ही ज्याच्यासाठी वर्णन करून सांगितला आहे तो देहाचा वेध आता सांगा, ज्यामुळे आकाशात भ्रमण करण्याचे सामर्थ्य **(**प्राप्त) होईल.

==================

**रसार्णव** ग्रंथाच्या आधारावर पारदाचा लोखंड आणि शरीर यासंबंधी उपयोग याविषयी पुढील खंडात सांगत आहेत.

=================

## खंड २६

**यथा लोहे तथा देहे कर्तव्यः सूतकः सता ।**

**समानं कुरुते देवि प्रत्ययं देहलोहयोः || र.अ.१७.१६५ ||**

**पूर्वं लोहे परीक्षेत पश्चाद्देहे प्रयोजयेत् ॥ र.अ.१७.१६६ ॥**

================

**पदार्थ**-

**यथा-** ज्याप्रमाणे, **लोहे-** लोखंडावर, **तथा-** त्याप्रमाणेच, **देहे-** देहावर, **सता-** सज्जनाने, **सूतकः-** पाऱ्याचा, **कर्तव्यः-** (प्रयोग) करावा,

**देवि-** हे देवि, **देहलोहयोः-** देहावर आणि लोखंडावर, **समानं-** एकसारखाच, **प्रत्ययं-** परिणाम, **कुरुते-** करतो,

**पूर्वं-** प्रथम, **लोहे-** लोखंडावर, **परीक्षेत-** परीक्षा करावी, **पश्चाद्देहे-** नंतर देहावर, **प्रयोजयेत्-** प्रयोग करावा.

===============

**अनुवाद-**

ज्याप्रमाणे लोखंडावर त्याप्रमाणेच देहावर सज्जनाने पाऱ्याचा (प्रयोग) करावा. हे देवि, (पारा) देहावर आणि लोखंडावर एकसारखाच परिणाम करतो.

प्रथम लोहावर त्याची परीक्षा करावी (आणि) नंतर देहावर त्याचा उपयोग करावा.

================

मुक्तीसाठी देहवेध आवश्यक आहे, स्पष्ट करण्यासाठी आक्षेप मांडून त्यांचे समाधान पुढील खंडात करीत आहेत.

=================

## ६.मुक्तीसाठी देहवेध आवश्यक

खंड २७

**(आक्षेपभाष्यम्)**

**ननु सच्चिदानन्दात्मकपरतत्त्वस्फुरणादेव मुक्तिसिद्धौ किमनेन दिव्यदेहसंपादनप्रयासेनेति चेत्,**

**(समाधानभाष्यम्)**

**तदेतद्वार्तम् । अवार्तशरीरालाभे तद्वार्ताया अयोगात् ।**

===============

**पदार्थ-**

**ननु- सच्चिदानन्दात्मकपरतत्त्वस्फुरणादेव-**सत्, चित् आणि आनंद असे स्वरूप असणाऱ्या परमतत्त्वाच्या (स्फुरणरूप) साक्षात्कारामुळे, **मुक्तिसिद्धौ-** मुक्ती प्राप्त होत असताना, **अनेन-** या, **दिव्यदेहसंपादनप्रयासेन-** दिव्य देह संपादन करण्यासाठी हा प्रयासाने, **किम्-** काय,

**इति-** असे, **चेत्-**तर, **तदेतद्वार्तम्-** ते हे व्यर्थ, **अवार्तशरीरालाभे-** सामर्थ्यसंपन्न शरीराचा लाभ झाल्याशिवाय, **तद्वार्ताया-** मुक्तीची गोष्ट करणे, **अयोगात्-** अयोग्य असल्यामुळे.

===============

**अनुवाद-**

**(आक्षेपभाष्य)**

सत्, चित् आणि आनंद असे स्वरूप असणाऱ्या पर तत्त्वाचा (स्फुरणरूप) साक्षात्कार झाला म्हणजेच मुक्ती प्राप्त होते असे असता दिव्य देह संपादन करण्यासाठी हा प्रयासाने काय (साध्य होईल)?

**(समाधानभाष्य)**

असे (म्हटले) तर ते हे व्यर्थ (आहे, कारण) सामर्थ्यसंपन्न शरीराचा लाभ झाल्याशिवाय त्या मुक्तीची गोष्ट करणे अयोग्य असल्यामुळे.

=================

सामर्थ्य संपन्न शरीराचे महत्त्व कथन करताना रसहृदयतंत्र ग्रंथाच्या आधारावर पुढील खंडात पुष्टी करीत आहेत

## खंड २८

**तदुक्तं रसहृदये-**

**गलितानल्पविकल्पः सर्वाध्वविवक्षितश्चिदानन्दः ।**

**स्फुरितोऽप्यस्फुरिततनोः करोति किं जन्तुवर्गस्य ॥ (र.हृ.१.२०) इति ।**

================

**पदार्थ**-

**रसहृदये-** रसहृदयात, **तदुक्तम्-** ते म्हटले आहे,

**सर्वाध्वविवक्षितः-**सर्व (दार्शनिक) मार्गात वर्णन केलेला, **गलितानल्पविकल्पः-** सर्व विकल्प ज्यात गळून पडतात असा, **चिदानन्दः-** चिद्रूप आनंद, **स्फुरितो-** स्फुरित झाला, **अपि-** तरी, **अस्फुरिततनोः-** शरीरे तेजाने झगमगत नाहीत अशा, **जन्तुवर्गस्य-** प्राण्यांचे, **किं-** काय, **करोति-** करणार.

==============

**अनुवाद**-

रसहृदयात म्हटले आहे-

सर्व (दार्शनिक) मार्गात वर्णन केलेला, सर्व विकल्प ज्यात गळून पडतात असा चिद्रूप आनंद जरी स्फुरित झाला तरी शरीरे तेजाने झगमगत नाहीत अशा प्राण्यांचे (तो) काय करणार?

====================

शरीराची समाधीसाठीची असमर्थता रसहृदयतंत्र ग्रंथातील उद्धारणावरून पुढील खंडात स्पष्ट करीत आहेत.

==============

## खंड २९

**यज्जरया जर्जरितं कासश्वासादिदुःखविशदं च ।**

**योग्यं यन्न समाधौ प्रतिहतबुद्धीन्द्रियप्रसरम् ॥ (र.हृ.१.२९) इति ।**

===============

**पदार्थ-**

**यज्जरया-** जे, म्हातारपणामुळे, **जर्जरितम्-** जर्जर झालेले, **कासश्वासादिदुःखविशदं-** खोकला, दमा इत्यादी दुःखप्रद विकार उत्पन्न झालेले, **प्रतिहतबुद्धीन्द्रियप्रसरम्-** ज्ञानेंद्रियांची शक्ती कुंठित झालेले, **यत्-** जे, **समाधौ-** समाधीला, **न योग्यम्-** योग्य नाही.

==============

**अनुवाद-**

जे म्हातारपणामुळे जर्जर झालेले, खोकला, दमा इत्यादी दुःखप्रद विकार उत्पन्न झालेले, ज्ञानेंद्रियांची शक्ती कुंठित झालेले (शरीर) समाधीसाठी योग्य नाही.

==================

शरीराच्या तीन अवस्था बालपण, तारुण्य आणि म्हातारपण आणि मुक्ती यांच्या विषयी कथन पुढील खंडात करीत आहेत.

=================

## खंड ३०

**बाल: षोडशवर्षो विषयरसास्वादलम्पट: परतः ।**

**यातविवेको वृद्धो मर्त्यः कथमाप्नुयान्मुक्तिम् ॥ र.रत्न.स.१.५७ ।**

===============

**पदार्थ-**

**षोडशवर्षो**- सोळा वर्षांपर्यंत, **बाल**ः- बालपण, **परत**ः**-** त्यानंतर, **विषयरसास्वादलम्पट:-** विषयांच्या रसास्वादात निमग्न, **यातविवेको-** विवेकहीन झालेला, **वृद्धो-** म्हातारपण, **मर्त्य**ः**-** मरणशील प्राणी, **कथम्-** कसा बरे, **मुक्तिम्-** मुक्ती**, आप्नुयात्-** प्राप्त करू शकेल.

==============

**अनुवाद-**

सोळा वर्षांपर्यंत बालपण, त्यानंतर विषयांच्या रसास्वादात निमग्न (तरुण आणि) विवेकहीन म्हातारपण (असा) मरणशील प्राणी कसा बरे मुक्ती प्राप्त करू शकेल ?

===============

संसार आणि मुक्ती यांची सिद्धता करताना आक्षेप मांडून त्यांचे समाधान पुढील खंडात करीत आहेत.

=================

## ७.जीवन्मुक्तीची उपपन्नता

### खंड ३१

**(आक्षेपभाष्यम्)**

**ननु जीवत्वं नाम संसारित्वम्, तद्विपरीतं मुक्तत्वम्, तथा च परस्परविरुद्धयोः कथमेकायतनत्वमुपपन्नमिति चेत्,**

**(समाधानभाष्यम्)**

**तदनुपपन्नम्, विकल्पानुपपत्तेः।**

===============

**पदार्थ-**

**ननु**-खरोखर, **जीवत्वम्-** जिवन्त असणे, **नाम-** म्हणजे, **संसारित्वम्-** संसारात असणे, **तद्विपरीतम्-** त्याच्या उलट, **मुक्तत्वम्-** मुक्तावस्था, **तथा-**तेव्हा, **च-**आणि, **परस्परविरुद्धयोः-** दोन परस्परविरुद्ध गोष्टी, **एकायतनत्वम्-** एकाच ठिकाणी असणे, **कथम्-** कसे, **उपपन्नम्-** उपपन्न, **इति-**असे,

**चेत्-**तर, **तत्-**ते, **विकल्पानुपपत्तेः-**दोन विकल्पांची उपपत्ती लागत नसल्यामुळे, **अनुपपन्नम्-** उपपन्न, सिद्ध होत नाही.

==============

**अनुवाद-**

(**आक्षेपभाष्य**)

जिवन्त असणे म्हणजे संसारात असणे, त्याच्या उलट ती मुक्तावस्था; तेव्हा ह्या दोन परस्परविरुद्ध गोष्टी एकाच ठिकाणी असणे कसे काय उपपन्न आहे ?

(**समाधानभाष्य**)

असे (म्हंटले) तर त्या दोन विकल्पांची उपपत्ती लागत नसल्यामुळे ते उपपन्न (सिद्ध) होत नाहीत.

====================

संसार आणि मोक्ष यांच्या आक्षेपांची चर्चा करत त्याचे समाधान पुढील खंडात सांगत आहेत.

==================

## खंड ३२

**मुक्तिस्तावत्सर्वतीर्थकरसंमता, सा किं ज्ञेयपदे निविशते न वा। चरमे शशविषाणकल्पा स्यात् । प्रथमे न जीवनं वर्जनीयम्, अजीवतो ज्ञातृत्वानुपपत्तेः ।**

================

**पदार्थ-**

**तावत्-** तेव्हा, **मुक्तिः-** मुक्ती, **सर्वतीर्थकरसंमता-** सर्व शास्त्रप्रवर्तकांना मान्य आहे, **सा**-ती, **ज्ञेयपदे**- ज्ञेय पदार्थांमध्ये, **निविशते-** समाविष्ट होते**, किं वा-** किंवा **न-** नाही, **चरमे-** दुसऱ्या पर्यायात, **शशविषाणकल्पा-** सशाच्या शिंगाप्रमाणे केवळ काल्पनिक, **स्यात्-**होईल, **प्रथमे-** पहिल्या पर्यायात, **जीवनम्-** जीवनाची**, न वर्जनीयम्-** आवश्यकता टाळता येणार नाही, **अजीवतो-** जो जिवंत नाही त्याचे, **ज्ञातृत्वानुपपत्तेः-** ज्ञातृत्व सिद्‌ध होऊ शकणार नसल्यामुळे,

==============

**अनुवाद-**

मुक्ती सर्व शास्त्रप्रवर्तकांना मान्य आहे, तिची ज्ञेय पदार्थांमध्ये गणना होते की नाही? दुसऱ्या पर्यायात (मुक्ती) सशाच्या शिंगाप्रमाणे केवळ काल्पनिक होईल. पहिल्या पर्यायात (मुक्तावस्थेतही) जीवनाची आवश्यकता टाळता येणार नाही, कारण जो जिवंत नाही त्याचे ज्ञातृत्व सिद्‌ध होऊ शकणार नसल्यामुळे.

================

जीवन्मुक्तीची सिद्‌धता सांगताना रसेश्वरसिद्‌धांत ग्रंथाच्या आधारे पुढील खंडात करण्याचा प्रयत्न करत आहेत.

================

खंड ३३

**तदुक्तं रसेश्वरसिद्धान्ते -**

**रसाङ्कमेयमार्गोक्तो जीवमोक्षोऽन्यथा तु न ।**

===============

**पदार्थ-**

**रसेश्वरसिद्धान्ते-** रसेश्वरसिद्धान्तात, **तदुक्तम्-** ते म्हटले आहे,

**रसाङ्कमेयमार्गोक्तो-** रसाने चिन्हित झालेला, जाणावयास योग्य अशा मार्गाने सांगितलेला, **जीवमोक्षो-**जीवमोक्ष, **अन्यथा-** दुसऱ्या प्रकारे, **तु न**- नाही,

==============

**अनुवाद-**

रसेश्वरसिद्धान्तात म्हटले आहे-

रसाने चिन्हित झालेला, जाणावयास योग्य अशा मार्गाने सांगितलेला जीवमोक्ष दुसऱ्या (कोणत्याही) प्रकारे (सिद्ध) नाही. भिन्न भिन्न युक्तिवादांचा अवलंब करून इतर प्रमाणांचा पुरस्कार करणाऱ्या

===============

जिवंतपणा आणि ज्ञेयत्व याविषयी पुढील खंडात सांगत आहेत.

====================

## खंड ३४

**प्रमाणान्तरवादेषु युक्तिभेदावलम्बिषु ॥**

**ज्ञातृज्ञेयमिदं विद्धि सर्वतन्त्रेषु संमतम् ।**

**नाजीवञ्ज्ञास्यति ज्ञेयं यदतोऽस्त्येव जीवनम् ॥ इति ।**

===============

**पदार्थ-**

**युक्तिभेदावलम्बिषु-** भिन्न भिन्न युक्तिवादांचा अवलंब करणाऱ्या, **प्रमाणान्तरवादेषु-** इतर प्रमाणांचा पुरस्कार करणाऱ्या **सर्वतन्त्रेषु-** सर्व शास्त्रांमध्ये, **ज्ञातृज्ञेयम्-** ज्ञात्याला ज्ञेय आहे, **इदम्-** हे, **संमतम्-** संमत झालेले आहे, **विद्धि-** लक्षात घ्यावे, **अजीवन्**- जो जिवंत नाही तो, **ज्ञेयम्-** ज्ञेय, **न ज्ञास्यति**- जाणू शकणार नाही, **यदतो-** म्हणून, **जीवनम्-** जीवन, **अस्ति एव-** आहेच.

==============

**अनुवाद-**

भिन्न भिन्न युक्तिवादांचा अवलंब करणाऱ्या, इतर प्रमाणांचा पुरस्कार करणाऱ्या, सर्व शास्त्रांमध्ये ही जीवन्मुक्ती ज्ञात्याला ज्ञेय आहे हे संमत झालेले आहे हे लक्षात घ्यावे.

आणि ज्याअर्थी जो जिवंत नाही तो ज्ञेय जाणू शकणार नाही त्याअर्थी (त्या अवस्थेत) जीवन हे असतेच.'

==============

शरीराचे अमरत्व सिद्ध करताना असे कोणी अमरत्वास प्राप्त झाले आहे का याचा खुलासा पुढील खंडात करीत आहेत.

================

## खंड ३५

**न चेदमदृष्टचरमिति मन्तव्यम्, विष्णुस्वामिमतानुसारिभिर्नृपञ्चास्य शरीरस्य नित्यत्वोपपादनात् ।**

================

**पदार्थ-**

**च-** आणि, **इदम्**-हे, **अदृष्टचरम्-** पाहण्यात येत नाही, **इति**-असे, **न मन्तव्यम्-** मानू नये, **विष्णुस्वामिमतानुसारिभिः-** विष्णुस्वामींच्या मताचे अनुसरण करणाऱ्यांनी, **नृपञ्चास्य-** नृसिंहाच्या, **शरीरस्य-** शरीराचे, **नित्यत्वोपपादनात्-** नित्यत्व सिद्ध असल्यामुळे.

===============

**अनुवाद-**

आणि हे (नित्य शरीर) पाहण्यात येत नाही असे मानू नये; (कारण) विष्णुस्वामींच्या मताचे अनुसरण करणाऱ्यांनी नृसिंहाच्या शरीराचे नित्यत्व सिद्ध असल्यामुळे.

===============

साकारसिद्धि ग्रंथाच्या आधारे रससिद्ध अमर शरीराचे वर्णन करताना श्री विष्णू स्वामी यांना संमत नृसिंह यांचे वर्णन पुढील खंडात करत आहेत.

===============

## खंड ३६

**तदुक्तं साकारसिद्धौ-**

**सच्चिन्नित्यनिजाचिन्त्यपूर्णानन्दकविग्रहम् ।।**

**नृपञ्चास्यमहं वन्दे श्रीविष्णुस्वामिसंमतम् ॥ इति ।**

================

**पदार्थ-**

**साकारसिद्धौ-** साकारसिद्धि ग्रंथात, **तदुक्तम्-** ते म्हटले आहे,

**सच्चिन्नित्यनिजाचिन्त्यपूर्णानन्दकविग्रहम्-** सद्रूप, चिद्रूप, नित्य, अचिन्त्य असे स्वतःचे पूर्ण आनंदरूपी शरीर असलेल्या, **श्रीविष्णुस्वामिसंमतम्-** श्रीविष्णुस्वामींना संमत असलेल्या, **नृपञ्चास्यम्-** नृसिंहाला, **अहम्-** मी, **वन्दे-** वंदन करतो.

==============

**अनुवाद-**

साकारसिद्धि ग्रंथात म्हटले आहे -

सद्रूप, चिद्रूप, नित्य, अचिन्त्य असे स्वतःचे पूर्ण आनंदरूपी शरीर असलेल्या, श्रीविष्णुस्वामींना संमत असलेल्या, नृसिंहाला मी वंदन करतो.

====================

नृसिंह शरीर कसे बरे नित्य अर्थात अस्तित्वात असेल असा आक्षेप पुढील खंडात सांगितला आहे.

==================

## खंड ३७

**(आक्षेपभाष्यम्)**

**नन्वेतत्सावयवं रूपवदवभासमानं नृकण्ठीरवाङ्गं सदिति न संगच्छत इत्यादिनाक्षेपपुरःसरं,**

===============

**पदार्थ-**

**ननु-** खरोखर, **एतत्-** हे, **सावयवम्-** अवयवांनी युक्त असलेले, **रूपवद्-** रूपाने युक्त असे, **अवभासमानम्-** भासमान होणारे, **नृकण्ठीरवाङ्गम्-** नृसिंह-शरीर, **सदिति-** नित्य, अस्तित्वात आहे, **न संगच्छत-** (हे) सुसंगत वाटत नाही, **इत्यादिनाक्षेपपुरःसरम्-** इत्यादी आक्षेप उपस्थित करून

==============

**अनुवाद-**

**(आक्षेपभाष्य)**

खरोखर हे अवयवांनी युक्त असलेले, रूपाने युक्त असे भासमान होणारे नृसिंह-शरीर नित्य, अस्तित्वात आहे (हे) सुसंगत वाटत नाही असा आक्षेप उपस्थित करून

================

जीवन्मुक्ती सिद्ध करताना पुढील खंडात प्रत्यक्ष, श्रुती आणि पुराण या तीन प्रमाणांनी सिद्ध करीत आहेत.

===============

खंड ३८

**(समाधानभाष्यम्)**

**सनकादिप्रत्यक्षं, 'सहस्रशीर्षा पुरुषः' (श्वे.३.१४) इत्यादिश्रुति-, 'तमद्भुतं बालकमम्बुजेक्षणं चतुर्भुजं शङ्खगदाधुदायुधम् (भाग. १०.३.९) इत्यादिपुराण-लक्षणेन प्रमाणत्रयेण सिद्धं नृपञ्चाननाङ्गं कथमसत्स्यादिति सदादीनि विशेषणानि गर्भश्रीकान्तमिश्रविष्णुस्वामिचरणपरिणतान्तःकरणः प्रतिपादितानि । तस्मादस्मदिष्टदेहनित्यत्वमत्यन्तादृष्टं न भवतीति पुरुषार्थकामुकैः पुरुषैरेष्टव्यम् ।**

===============

**पदार्थ-**

**सनकादिप्रत्यक्षं-** सनक इत्यादींना दिसलेले प्रत्यक्ष, **'सहस्रशीर्षा पुरुषः**-'हजार शीर्षे असलेला पुरुष', **इत्यादिश्रुति-** इत्यादी श्रुतिवचन, **चतुर्भुजं-** चार भुजा असलेल्या, **शङ्खगदाधुदायुधम्-** शंखगदादी आयुधे धारण करणाऱ्या, **अम्बुजेक्षणं-** कमलासमान नेत्र असणाऱ्या, **'तमद्भुतं-** त्या अद्भुत, **बालकम्-** बालकाला, **इत्यादिपुराण-लक्षणेन-** इत्यादी पुराणवचन, **प्रमाणत्रयेण-** तीन प्रमाणांनी, **सिद्धं-** सिद्ध होणारे, **नृपञ्चाननाङ्गं-** नृसिंहशरीर, **कथम्**-कसे बरे, **असत्-** अस्तित्वरहित, **स्यात्**-असेल, **इति**-अशा प्रकारे, **सदादीनि-** सत्-चित् इत्यादी, **विशेषणानि-** विशेषणे, **गर्भश्रीकान्तमिश्रविष्णुस्वामिचरणपरिणतान्तःकरणः-** (याची

व्याख्या करताना) विष्णुस्वामींच्या चरणसेवेने ज्यांची बुद्धी परिणत झाली त्या गर्भश्रीकान्त मिश्रानी, **प्रतिपादितानि-** प्रतिपादन केले आहे, **तस्मात्**-म्हणून, **अस्मदिष्टदेहनित्यत्वम्-** आम्हाला अभिप्रेत असलेले देहाचे नित्यत्व, **अत्यन्तादृष्टः**- कोठेच पाहण्यात येत नाही, **इति**-असे, **न भवति**-होत नाही, **पुरुषार्थकामुकैः-** पुरुषार्थ प्राप्त करू इच्छिणाऱ्या, **पुरुषैः-** पुरुषांनी, इष्टव्यम्- इच्छा धरावी.

==============

**अनुवाद-**

**(समाधानभाष्य)**

सनक इत्यादींना दिसलेले प्रत्यक्ष, 'हजार शीर्षे असलेला पुरुष' इत्यादी श्रुतिवचन आणि चार भुजा असलेल्या, शंखगदादी आयुधे धारण करणाऱ्या, कमलासमान नेत्र असणाऱ्या, त्या अद्भुत बालकाला' इत्यादी पुराणवचन, याप्रमाणे (प्रत्यक्ष, श्रुति आणि पुराण ह्या) तीन प्रमाणांनी सिद्ध होणारे नृसिंहशरीर कसे बरे अस्तित्वरहित असेल? अशाप्रकारे त्यांनी सत्, चित् इत्यादी विशेषणांचे प्रतिपादन केले आहे. म्हणून आम्हाला अभिप्रेत असलेले देहाचे नित्यत्व कोठेच पाहण्यात येत नाही असे होत नाही. तेव्हा पुरुषार्थ प्राप्त करू इच्छिणाऱ्या पुरुषांनी (त्या नित्य शरीराची) इच्छा धरावी.

====================

सर्व विद्यांचे आश्रयस्थान हे शरीरच आहे हे पुन्हा एकदा पुढील खंडात स्पष्ट करीत आहेत.

==================

## खंड ३९

**अत एवोक्तम् -**

**आयतनं विद्यानां मूलं धर्मार्थकाममोक्षाणाम् ।**

**श्रेयः परं किमन्यच्छरीरमजरामरं विहायकम् ।। र.रत्न.स.१.७४ ।**

================

**पदार्थ-**

**अत एव-** म्हणूनच, **उक्तम्-** म्हटले आहे

**विद्यानाम्-** विद्यांचे, **आयतनम्-** निधानस्थान, **धर्मार्थकाममोक्षाणाम्-** धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांचे, **मूलम्-** मूळ, **अजरामरम्**- अजरामर, **शरीरम्**- देहा, **विहायकम्-** शिवाय**,** **अन्यत्-** दुसरे**,** **किम्-** काय**,** **परम्-** परम, **श्रेयः-** श्रेयस्कर.

===============

**अनुवाद-**

म्हणूनच म्हटले आहे-

सर्व विद्यांचे निधानस्थान, धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांचे मूळ अशा एका अजरामर देहाखेरीज दुसरे काय परम श्रेयस्कर आहे?

================

रस अर्थात पारद हाच अमरत्व प्रदान करणारा आहे, हेच पुढील खंडात स्पष्ट करतात.

================

## खंड ४०

**अजरामरीकरणसमर्थश्च रसेन्द्र एव ।**

**तदाह**

**एकोऽसौ रसराजः शरीरमजरामरं कुरुते ॥ र.रत्न.स.१.४३ ।**

===============

**पदार्थ-**

च- आणि, **अजरामरीकरणसमर्थः-** अजरामर करण्यास समर्थ असा, **रसेन्द्र एव-** रसराजच,

**तदाह-** म्हटलेच आहे,

**एको- एक, असौ- हा, रसराजः-** रसराजच, **शरीरम्- शरीराला, अजरामरम्-** अजरामर, **कुरुते-** करतो.

===============

**अनुवाद-**

आणि अजरामर करण्यास समर्थ असा रसराजच आहे.

म्हटलेच आहे -

एक तो रसराजच शरीर अजरामर करतो.

=================

रसाचे माहात्म्य पुढील खंडात सांगितले जात आहे.

==================

# ८.रसमाहात्म्य, रसलिंगपूजा

## खंड ४१

**किं वर्ण्यते रसस्य माहात्म्यम् । दर्शनस्पर्शनादिनापि महत्फलं भवति ।**

===============

**पदार्थ-**

**रसस्य-** रसाचा, **माहात्म्यम्-** महिमा, **किम्-** काय, **वर्ण्यते-** वर्णन करावा, **दर्शनस्पर्शनादिनापि-** दर्शन, स्पर्शन इत्यादींनी सुद्धा, **महत्फलम्-** मोठे फल, **भवति-** मिळते.

==============

**अनुवाद-**

रसाचा महिमा काय वर्णन करावा? त्याच्या दर्शन, स्पर्शन इत्यादींनी सुद्धा मोठे फल प्राप्त होते.

=================

रसाचे माहात्म्य सांगताना सहा प्रकारचे फल मिळते ते पुढील खंडात रसार्णव ग्रंथातून उद्धृत करीत आहेत.

===============

## खंड ४२

**तदुक्तं रसार्णवे-**

**दर्शनात्स्पर्शनात्तस्य भक्षणात्स्मरणादपि ।**

**पूजनाद्रसदानाच्च दृश्यते षड्विधं फलम् ॥ र.अ.१.३७ ॥**

================

**पदार्थ-**

**रसार्णवे-** रसार्णवात, **तदुक्तम्-** म्हटले आहे,

**तस्य-** त्याच्या, **दर्शनात्-** दर्शनाने, **स्पर्शनात्-** स्पर्शनाने, **भक्षणात्-** भक्षणाने, **स्मरणात्-** स्मरणाने, **पूजनात्-** पूजनाने, **च-**आणि, **रसदानात्-** रसदानाने **षड्विधम्-** सहा प्रकारचे **फलम्-** फल **दृश्यते-** दिसून येते.

===============

**अनुवाद-**

रसार्णवात म्हटले आहे -

रसाच्या दर्शनाने, स्पर्शनाने, भक्षणाने, स्मरणाने, पूजनाने आणि दानाने सहा प्रकारचे फल दिसून येते.

================

पृथ्वीवर जी काही शिवलिंगे आहेत त्यांच्या दर्शनाने मिळणारे पुण्य आणि रस अर्थात पारद दर्शनाने मिळणारे पुण्य यांचे वर्णन पुढील खंडात करीत आहेत.

================

## खंड ४३

**केदारादीनि लिङ्गानि पृथिव्यां यानि कानिचित् ।**

**तानि दृष्ट्वा तु यत्पुण्यं तत्पुण्यं रसदर्शनात् ॥ र.अ.१.३८ इत्यादिना।**

================

**पदार्थ-**

**पृथिव्याम्-** पृथ्वीवर, **केदारादीनि-** केदार इत्यादी, **यानि-** जी, **कानिचित्-** काही, **लिङ्गानि-** शिवलिंगे, **तानि-** ती**,** **दृष्ट्वा-** पाहून**,** दर्शन घेऊन, **यत्पुण्यम्-** जे पुण्य, **तत्पुण्यम्-** ते पुण्य, **रसदर्शनात्-** रसाच्या दर्शनाने.

===============

**अनुवाद-**

पृथ्वीवर केदार आदी जी काही शिवलिंगे आहेत त्यांच्या दर्शनाने जे पुण्य मिळते, ते पुण्य रसाच्या दर्शनाने मिळते, इत्यादी.

=================

## खंड ४४

**अन्यत्रापि -**

**काश्यादिसर्वलिङ्गेभ्यो रसलिङ्गार्चनाच्छिवः ।**

**प्राप्यते येन तल्लिङ्गं भोगारोग्यामृतप्रदम् ॥ इति ।**

================

**पदार्थ-**

**अन्यत्रापि-** इतरत्रही,

**काश्यादिसर्वलिङ्गेभ्यो-** काशी इत्यादी सर्व लिंगांपेक्षा, **रसलिङ्गार्चनात्-** रसलिंगाच्या पूजेने, **शिवः-** शिव, **येन-** ज्याअर्थी, **प्राप्यते-** प्राप्ती होते, **तल्लिङ्गम्-** ते लिंग, **भोगारोग्यामृतप्रदम्-** भोग, आरोग्य आणि अमृतत्व देणारे.

===============

**अनुवाद-**

इतरत्रही म्हटले आहे -

काशी इत्यादी (स्थानी असलेल्या) सर्व लिंगांपेक्षा रसलिंगाच्या पूजेने ज्याअर्थी शिवाची प्राप्ती होते, त्याअर्थी ते लिंग भोग, आरोग्य आणि अमृतत्व देणारे (आहे).

=====================

चुकून जरी रस निंदा कानी पडली तर दोष निर्माण होऊ नये आणि रस निंदकापासून आपण स्वतःस कसे वाचवावे याविषयी पुढील खंडात सांगतात.

==================

# ९.रसनिंदेत दोष

## खंड ४५

**रसनिन्दायाः प्रत्यवायोऽपि दर्शितः**

**प्रमादाद्रसनिन्दायाः श्रुतावेनं स्मरेत्सुधीः ।**

**द्राक्त्यजेन्निन्दकं नित्यं निन्दया पूरिताशुभम् ।। इति ।**

===============

**पदार्थ-**

**रसनिन्दायाः-** रसनिंदेचा, **प्रत्यवायो-** दोष, **अपि-** सुद्धा, **दर्शितः-** दाखवून दिला आहे,

**प्रमादात्-** चुकीने, **रसनिन्दायाः-** रसाची निंदा, **श्रुतौ-** कानावर पडली, **सुधीः-** बुद्धिमान माणसाने, **एनम्-** त्याचे, **स्मरेत्-** स्मरण करावे, **नित्यम्-** सदा, **निन्दया-** निंदेमुळे, **पूरिताशुभम्-** अशुभाने भरलेल्या **निन्दकम्-** निन्दकाचा, **द्राक्-** तत्काळ, **त्यजेत्-** त्याग करावा.

==============

**अनुवाद-**

रसनिंदेचा दोष सुद्धा दाखवून दिला आहे-

चुकीने रसाची निंदा कानावर पडली तर बुद्धिमान माणसाने त्याचे (रसाचे) स्मरण करावे. सदा निंदेमुळे अशुभाने भरलेल्या निंदकाचा तत्काळ त्याग करावा.

================

रससिद्ध शरीर हे ब्रह्मत्व प्राप्तीस कारण ठरते याचे विवेचन पुढील खंडात करतात.

=================

## १०.दिव्य देहाने ब्रह्मत्वप्राप्ती

### खंड ४६

**तस्मादस्मदुक्तया रीत्या दिव्यं देहं संपाद्य योगाभ्यासवशात्परतत्त्वे दृष्टे पुरुषार्थप्राप्तिर्भवति ।**

**तदा**

**भ्रूयुगमध्यगतं यच्छिखिविद्युत्सूर्यवज्जगद्भासि ।**

**केषांचित्पुण्यदृशामुन्मीलति चिन्मयं ज्योतिः ॥(र.हृ.१.२१)**

===============

**पदार्थ-**

**तस्मात्**-म्हणून, **अस्मदुक्तया-** आम्ही सांगितलेल्या, **रीत्या-** पद्धतीने, **दिव्यम्-** दिव्य, **देहम्-** शरीर, **संपाद्य-** प्राप्त करून, **योगाभ्यासवशात्-** योगाभ्यासाच्या द्वारा, **परतत्त्वे-** परतत्त्वाचे, **दृष्टे-** दर्शन झाले, **पुरुषार्थप्राप्तिः-** पुरुषार्थाची प्राप्ती, **भवति-** होते,

**तदा-** त्या समयी,

**भ्रूयुगमध्यगतम्-** दोन्ही भुवयांच्या मध्ये असलेली, **यच्छिखिविद्युत्सूर्यवज्जगद्भासि-** अग्नी, विद्युत् आणि सूर्य यांच्याप्रमाणे सर्व जग प्रकाशित करणारी, **चिन्मयम्-** चित्स्वरूपाची,

**ज्योतिः-** ज्योती, **केषांचित्-** काही, **पुण्यदृशाम्-** पुण्य दृष्टी असणाऱ्या मनुष्यांत, **उन्मीलति-** प्रकट होते.

==============

**अनुवाद-**

म्हणून आम्ही सांगितलेल्या पद्धतीने दिव्य शरीर प्राप्त करून योगाभ्यासाच्या द्वारा परतत्त्वाचे दर्शन झाले की पुरुषार्थाची प्राप्ती होते.

त्या समयी

दोन्ही भुवयांच्या मध्ये असलेली, अग्नी, विद्युत् आणि सूर्य यांच्याप्रमाणे सर्व जग प्रकाशित करणारी चित्स्वरूपाची ज्योती काही पुण्य दृष्टी असणाऱ्या मनुष्यांत उन्मीलित (प्रकट) होते.

=================

रसाचे परमानंदत्व स्पष्ट करताना रसहृदयतंत्र ग्रंथाच्या आधारे स्पष्ट करीत आहेत.

================

## खंड ४७

**परमानन्दैकरसं परमं ज्योतिःस्वभावमविकल्पम् ।**

**विगलितसकलक्लेशं ज्ञेयं शान्तं स्वसंवेद्यम् ॥(र.हृ.१.२२)**

===============

**पदार्थ-**

**परमानन्दैकरसम्-** आत्यंतिक आनंद हाच एक रस ज्यात आहे, **अविकल्पम्-** विकल्परहित, **विगलितसकलक्लेशम्-** सर्व क्लेश गळून पडले आहेत, **शान्तम्-** शान्त, **स्वसंवेद्यम्-** स्वसंवेद्य, **ज्ञेयम्-** ज्ञेय**,**

**परमं ज्योतिःस्वभावम्-** परम ज्योती-स्वभावाचे,

===============

**अनुवाद-**

आत्यंतिक आनंद हाच एक रस ज्यात आहे, विकल्परहित, ज्यात सर्व क्लेश गळून पडले आहेत, शांत, स्वसंवेद्य असे ज्ञेय आहे, (आणि जे) परम ज्योती-स्वभावाचे आहे.

==================

## खंड ४८

**तस्मिन्नाधाय मनः स्फुरदखिलं चिन्मयं जगत्पश्यन् ।**

**उत्सन्नकर्मबन्धो ब्रह्मत्वमिहैव चाप्नोति ॥ (र.हृ.१.२३)**

================

**पदार्थ-**

**तस्मिन्-** त्याच्या ठिकाणी, **मनः-** मन, **आधाय-** केंद्रित करून, **अखिलम्-** सर्व, **जगत्-** जग, **चिन्मयम्-** चित्स्वरूपात, **स्फुरत्-** स्फुरत

असलेले, **पश्यन्-** पाहणारा, **उत्सन्नकर्मबन्धो-** कर्मबंध सुटून तो, **इह एव-** या जगातच, **ब्रह्मत्वम्-** ब्रह्मत्व, **आप्नोति-** प्राप्त करतो.

==============

**अनुवाद-**

त्याच्या ठिकाणी मन केंद्रित करून सर्व जग चित्स्वरूपात स्फुरत असलेले पाहणारा (साधक) कर्मबंध सुटून याच जगात ब्रह्मत्व प्राप्त करतो.

=============

रसाचे आणि ब्रहम तत्त्वाचे एकरूपत्व पुढील खंडात स्पष्ट करतात.

==================

## ११.रसाचे ब्रह्माशी साम्य

### खंड ४९

**श्रुतिश्च 'रसो वै सः। रसं ह्येवायं लब्ध्वानन्दी भवति (तै. २.७.१)' इति । तदित्यं भवदैन्यदुःखभरतरणोपायो रस एवेति सिद्धम् ।**

===============

**पदार्थ-**

**च-** आणि, **सः**-तो, **रसः वै-** रसच, **रसम्- रसाची, लब्ध्वा-** प्राप्ती झाल्यावरच, **अयम्-** हा, **आनन्दी-** आनंदी, **भवति-** होतो, **इति-** असे, **श्रुतिः-** श्रुतिवचन, **तद्-** तेव्हा, **इति-** याप्रमाणे, **भवदैन्यदुःखभरतरणोपायो-** संसारातील दैन्य व दुःख यांचा भार दूर करण्याचा उपाय, **रस एव-** रस हाच, **इति-**असे**, सिद्धम्-** सिद्ध होते.

==============

**अनुवाद-**

आणि 'तो (परमात्मा) म्हणजे रस (होय). रसाची प्राप्ती झाल्यावरच हा (साधक) आनंदी होतो', असे श्रुतिवचन (आहे).

तेव्हा याप्रमाणे संसारातील दैन्य व दुःख यांचा भार दूर करण्याचा उपाय रस हाच (आहे) हे सिद्ध होते.

==================

## खंड ५०

**तथा च रसस्य परब्रह्मणा साम्यमिति प्रतिपादकः श्लोकः --**

**यः स्यात्प्रावरणाविमोचनधियां साध्यः प्रकृत्या पुनः**

**संपन्नः सह तेन दीव्यति परं वैश्वानरे जाग्रति ।**

**ज्ञातो यद्यपरं न वेदयति च स्वस्मात्स्वयं द्योतते**

**यो ब्रह्मेव स दैन्यसंसृतिभयात्पायादसौ पारदः ॥ इति ।**

===============

**पदार्थ-**

**च-** आणि, **तथा-** तदनुसार, **रसस्य-** रसाचे, **परब्रह्मणा-** परब्रह्माशी, **साम्यमिति-** साम्य असल्याचे, **प्रतिपादकः-** प्रतिपादन करणारा, **श्लोकः-** श्लोक,

**यः-** जो, **प्रावरणाविमोचनधियाम्-** अज्ञान, भ्रांतीपासून मुक्त होण्याची बुद्धी झालेल्यांसाठी, **प्रकृत्या-** प्रकृत्यनुसार, **साध्यः-** साध्य, **स्यात्-** होतो, **पुनः-**पुन्हा, **संपन्नः-** संपन्न झाल्यावर, **परं-**तर, **वैश्वानरे-** वैश्वानर, **जाग्रति-** जागृत झाला असता, **तेन-** त्याच्या, **सह-**बरोबर, **दीव्यति-** क्रीडा करतो, **यदि-**जर, **ज्ञातः-** ज्ञान झाले, **स्वस्मात्-** स्वतःहून, **अपरम्-** दुसऱ्याचे, **न वेदयति-** ज्ञान करवून देत नाही, **च-** आणि, **स्वयम्-** स्वतः, **द्योतते-** प्रकाशित होतो, **यो-**जो, **ब्रह्म इव-** परब्रह्मासमान

असलेला, **स-**तो, **असौ-**हा, **पारदः-**पारा, **दैन्यसंसृतिभयात्-** दैन्य आणि संसार यांच्या भयापासून, **पायात्-** रक्षण करो.

==============

**अनुवाद-**

आणि तदनुसार रसाचे परब्रह्माशी साम्य असल्याचे प्रतिपादन करणारा पुढील श्लोक आहे -

जो (रस) अज्ञान, भ्रांतीपासून मुक्त होण्याची बुद्धी (जागृत) झालेल्यांसाठी, प्रकृत्यनुसार साध्य होतो, तर संपन्न (साध्य) झालेला वैश्वानर जागृत झाला असता त्याच्याबरोबर क्रीडा करतो, जर त्याचे ज्ञान झाले तर जो स्वतःहून दुसऱ्या कशाचे ज्ञान करवून देत नाही, जो स्वयं प्रकाशित होतो. जो परब्रह्मासमान असलेला तो हा पारा दैन्य आणि संसार यांच्या भयापासून रक्षण करो.

================

## खंड ५१

**इति श्रीमत्सायणमाधवीये सर्वदर्शनसंग्रहे रसेश्वरदर्शनम् ।**

================

**पदार्थ-**

**इति- अशा प्रकारे, श्रीमत्सायणमाधवीये-** श्रीमान् सायणमाधवकृत, **सर्वदर्शनसंग्रहे-** सर्वदर्शनसंग्रहातील, **रसेश्वरदर्शनम्-** रसेश्वरदर्शन

===============

**अनुवाद-**

येथे श्रीमान् सायणमाधवकृत सर्वदर्शनसंग्रहातील रसेश्वरदर्शन समाप्त होते.

==================

# ग्रन्थान्तर्गत उद्धृत श्लोकसूची

अक्षतश्च लघुद्रावी तेजस्वी निर्मलो गुरुः । खंड १९

अनयोर्मेलनं देवि मृत्युदारिद्र्यनाशनम् ॥ इति ।खंड १०

अभ्रकस्तव बीजं तु मम बीजं तु पारदः । खंड १०

अष्टादश संस्कारा विज्ञातव्याः प्रयत्नेन ॥ र.हृ.१.३४ ।

आयतनं विद्यानां मूलं धर्मार्थकाममोक्षाणाम् । र.रत्न.स.१.५४ ।

आर्द्रत्वं च घनत्वं च तेजो गौरवचापलम् । र.अ.११.२००॥

इति धनशरीरभोगान्मत्वानित्यान् सदैव यतनीयम् । र.हृ.१.१० ॥

उत्सन्नकर्मबन्धो ब्रह्मत्वमिहैव चाप्नोति ॥ (र.हृ.१.२३)

एकोऽसौ रसराजः शरीरमजरामरं कुरुते ॥ र.रत्न.स.१.४३ ।

एतेऽन्ये बहवः सिद्धा जीवन्मुक्ताश्चरन्ति हि। खंड १४

करामलकवत्सापि प्रत्यक्षा नोपलभ्यते ।। र.अ.१.१३

कर्मयोगेण देवेशि प्राप्यते पिण्डधारणम् ।र.अ.१.१८ ॥

काश्यादिसर्वलिङ्गेभ्यो रसलिङ्गार्चनाच्छिवः । खंड ४४

केदारादीनि लिङ्गानि पृथिव्यां यानि कानिचित् । र.अ.१.३८

केषांचित्पुण्यदृशामुन्मीलति चिन्मयं ज्योतिः ॥(र.हृ.१.२१)

क्रामणवेधौ भक्षणमष्टादशधेति रसकर्म ॥ र.हृ.२.२ ।

गर्भद्रुतिबाह्यद्रुतिक्षारणसंरागसारणाश्चैव । र.हृ.२.२ ।

गलितानल्पविकल्पः सर्वाध्वविवक्षितश्चिदानन्दः । (र.हृ.१.२०)

गोविन्दभगवत्पादाचार्यो गोविन्दनायकः । खंड १३

चर्वटिः कपिलो व्यालिः कापालि: कन्दलायनः ।।खंड १३

ज्ञातृज्ञेयमिदं विद्धि सर्वतन्त्रेषु संमतम् । खंड ३४

ज्ञातो यद्यपरं न वेदयति च स्वस्मात्स्वयं द्योतते । खंड ५०

तं देहवेधमाचक्ष्व येन स्यात्खेचरी गतिः ।। र.अ.१८.१ ।।

तनुं रसमयीं प्राप्य तदात्मककथाचणाः ॥ इति ।खंड १४

तस्मात्तं रक्षयेत्पिण्डं रसैश्चैव रसायनैः ॥ र.अ.१.११

तस्मिन्नाधाय मनः स्फुरदखिलं चिन्मयं जगत्पश्यन् । (र.हृ.१.२३)

तस्य प्रसाधनविधौ सुधिया प्रतिकर्मनिर्मलाः प्रथमम् । र.हृ.१.३४ ।

तानि दृष्ट्वा तु यत्पुण्यं तत्पुण्यं रसदर्शनात् ॥ र.अ.१.३८ इत्यादिना।

दर्शनात्स्पर्शनात्तस्य भक्षणात्स्मरणादपि । र.अ.१.३७ ॥

दीपनगमनग्रासप्रमाणमथ जारणविधानम् ॥ र.हृ.२.१ ।

देवाः केचिन् महेशाद्या दैत्याः काव्यपुरःसराः । खंड १२

द्राक्त्यजेन्निन्दकं नित्यं निन्दया पूरिताशुभम् ।। इति ।खंड ४५

नाजीवञ्ज्ञास्यति ज्ञेयं यदतोऽस्त्येव जीवनम् ॥ इति ।खंड ३४

नानावर्णो भवेत्सूतो विहाय घनचापलम् । खंड १७

नृपञ्चास्यमहं वन्दे श्रीविष्णुस्वामिसंमतम् ॥ इति । खंड ३६

परमानन्दैकरसं परमं ज्योतिःस्वभावमविकल्पम् । (र.हृ.१.२२)

पारदो गदितो यस्मात्परार्थं साधकोत्तमैः ।। र.अ.१.३५ ।।

पूजनाद्रसदानाच्च दृश्यते षड्विधं फलम् ॥ र.अ.१.३७ ॥

पूर्वं लोहे परीक्षेत पश्चाद्देहे प्रयोजयेत् ॥ र.अ.१७.१६६ ॥

प्रमाणान्तरवादेषु युक्तिभेदावलम्बिषु ॥खंड ३४

प्रमादाद्रसनिन्दायाः श्रुतावेनं स्मरेत्सुधीः । खंड ४५

प्राप्यते येन तल्लिङ्गं भोगारोग्यामृतप्रदम् ॥ इति । खंड ४४

बद्धः खेचरतां कुर्याद्रसो वायुश्च भैरवि ॥ इति ।र.अ.१.१९॥

बाल: षोडशवर्षो विषयरसास्वादलम्पट: परतः ।र.रत्न.स.१.५७ ।

भ्रूयुगमध्यगतं यच्छिखिविद्युत्सूर्यवज्जगद्भासि । (र.हृ.१.२१)

मम देहरसो यस्माद्रसस्तेनायमुच्यते ॥ इति ।र.अ.१.३६ ।।

मुक्तास्ते रससिद्धा मन्त्रगणो किंकरो येषाम् ॥ र.हृ.१.७ ॥

मुक्तौ सा च ज्ञानात्तच्चाभ्यासात्स च स्थिरे देहे ॥ र.हृ.१.१० ॥

मुनयो वालखिल्याद्या नृपाः सोमेश्वरादयः ॥ खंड १२

मूर्च्छितो हरति व्याधीन्मृतो जीवयति स्वयम् । र.अ.१.१९॥

यः स्यात्प्रावरणाविमोचनधियां साध्यः प्रकृत्या पुनः ।खंड ५०

यज्जरया जर्जरितं कासश्वासादिदुःखविशदं च । (र.हृ.१.२९) इति ।

यथा लोहे तथा देहे कर्तव्यः सूतकः सता । र.अ.१७.१६५ ।।

यस्यैतानि न दृश्यन्ते तं विद्यान्मृतसूतकम् ॥ र.अ.११.२००॥

यातविवेको वृद्धो मर्त्यः कथमाप्नुयान्मुक्तिम् ॥ र.रत्न.स.१.५७ ।

ये चात्यक्तशरीरा हरगौरीसृष्टिजां तनुं प्राप्ताः । र.हृ.१.७ ॥

यो ब्रह्मेव स दैन्यसंसृतिभयात्पायादसौ पारदः ॥ इति । खंड ५०

योग्यं यन्न समाधौ प्रतिहतबुद्धीन्द्रियप्रसरम् ॥ (र.हृ.१.२९) इति ।

रसश्च पवनश्चेति कर्मयोगो द्विविधा स्मृतः ॥ र.अ.१.१८ ॥

रसाङ्कमेयमार्गोक्तो जीवमोक्षोऽन्यथा तु न । खंड ३३

लक्षणं दृश्यते यस्य मूर्च्छितं तं वदन्ति हि ॥ खंड १७

लोहवेधस्त्वया देव यदर्थमुपवर्णितः । र.अ.१८.१ ।।

विगलितसकलक्लेशं ज्ञेयं शान्तं स्वसंवेद्यम् ॥(र.हृ.१.२२)

श्रेयः परं किमन्यच्छरीरमजरामरं विहायकम् ।। र.रत्न.स.१.७४ ।

षड्दर्शनेऽपि मुक्तिस्तु दर्शिता पिण्डपातने। र.अ.१.१२

संपन्नः सह तेन दीव्यति परं वैश्वानरे जाग्रति । खंड ५०

संसारस्य परं पारं दत्तेऽसौ पारदः स्मृतः ॥ इति ।र.रत्ना.३.१.६॥

सच्चिन्नित्यनिजाचिन्त्यपूर्णानन्दकविग्रहम् ।। खंड ३६

समानं कुरुते देवि प्रत्ययं देहलोहयोः ।। र.अ.१७.१६५ ।।

सुप्तोऽयं मत्समो देवि मम प्रत्यङ्गसंभवः । र.अ.१.३६ ।।

स्फुरितोऽप्यस्फुरिततनोः करोति किं जन्तुवर्गस्य ॥ (र.हृ.१.२०) इति ।

स्फोटनं पुनरावृत्तौ बद्धसूतस्य लक्षणम् ॥ इति । खंड १९

स्वेदनमर्दनमूर्छनस्थापनपातननिरोधनियमाश्च । र.हृ.२.१ ।

# संदर्भग्रंथसूची


Aacharya Yadav, T. G. (1927). *रसहृदयतन्त्रम्, मुग्धावबोधिनी समाख्यासमुल्लसितम्.* Lahore: Motilaal Banarasi Das.

Abhyankar, V. S. (1924). *सर्वदर्शनसंग्रह, दर्शनाङ्कुरव्याख्या.* Mumbai: Nirnaya Sagar Press, Mumbai.

Amara-simha. (1990). *Amara-kosha (with the commentary of Maheshvara).* Pune: H.A. Bhave for Varadaa Books.

Apate, V. S. (1890). *Apate Sanskrit dictionary.* Pune: Department of Sanskrit Studies, University of Hyderabad, Hyderabad. http://sanskrit.uohyd.ac.in/cgi-bin/scl/SHMT/options1.cgi?word=%E0%A4%AA%E0%A4%B0&outencoding=DEV पासून प्राप्त

Atreya, B., & अनुवादक, ज. आ. (2003). *योगवासिष्ठदर्शनम्.* Mid□alasaiksa: āūthoĺa, Mid□alasaiksa, Yū. Ke. : S□rī Guru Vālmīka Sabhā.

Bhat□t□ācārya, T. T. ( (1962). ). *Vachaspatyam: (a comprehensive Sanskrit dictionary). .* Benares: Benares: Chowkhamba Sanskrit Series Office.

Devendra Nātha Pāṇḍeya, S. (2004). *Chāndogya Brāhaṇaṁ.* Navajīvana Pablikeśansa.

Feuerstein, G. (2003). *The Deeper Dimension of Yoga.* Boston: Shambala Publications, Boston, MA.

Gonda, J. (1963). *The Indian Mantra, Oriens, Vol. 16,.* The Netherlands: BRILL.

*Hindi Wordnet, CFILT, IITBombay*. (२००८). हिंदी शब्दबंध: http://www.cfilt.iitb.ac.in/wordnet/webswn/wn.php पासून प्राप्त

Juergensmeyer, M., & Roof, W. C. (2011). *Encyclopedia of Global Religion.* SAGE Publications, ISBN 978-1-4522-6656-5.

Krishnadas, K. (1966). *रसरत्नाकर, .* Mumbai: Kshemraj Krishnadas.

Kulkarni, M. (2007). *Sanskrit Wordnet*. Sanskrit Wordnet: http://www.cfilt.iitb.ac.in/sanskritwordnet पासून प्राप्त

Lochtefeld, J. (2001). *The Illustrated Encyclopedia of Hinduism, Volume 2,.* New York: The Rosen Publishing Group, .

MONIER-WILLIAMS, M. (1899). *A Sanskrit-English dictionary: Etymologically and philologically arranged with special reference to Cognate indo-european languages.* Oxford: The Clarendon Press.

Prafulla chandra Ray, H. c. (1985). *रसार्णवम्.* Calcutta: The Asiatic Society.

Ray, P. C. (एन. डी.). *History of Indian Chemistry Vol. II .* Colkatta: Asiatic Society.

SARASWATI, M. (1906). *Sarva Darshan Sangrah, .* Pune : ANAND ASHRAM MUDRANALAY.

Satpute, D. A. (एन. डी.). *Rasaratna Samuchchaya, with English translation.* Chaukhamba Sanskrit Pratishthan.

Sharma, R. (2002). *The aṣṭādhyāyī of pāṇini vol.01 & 2.* New Delhi: Munshilal Manoharlal Publishers PVT.LTD. post box 5715.

SINGH, P. U. (1962). *Sarva Darshan Sangrah.* Mumbai: Khemaraj Shrikrushnadas, SHRI VETESHWER Press Mumbai.

Vasu, V., & Vasu, H. (1808-1814 Saka era, (1866-)). *Sabdakalpadruma.* Calcutta: Calcutta.

Yadav, G. (2018). *"Abortion (Hinduism)", Hinduism and Tribal Religions, Encyclopedia of Indian Religions.* Netherlands,: Springer Netherlands,.

आगाशे, क. (1912). *वेदव्यासप्रणीतमहाभारतांतर्गता श्रीमद्भगवद्गीता : श्रीमधुसुदनसरस्वतीविरचितया गुढार्थदीपिकाख्यया व्याख्यया, तथा श्रीधरस्वामिविरचितसुबोधिन्याख्या व्याख्यया समेता.* पुणे: आनंदाश्रममुद्रणालय.

कंगले, र. प. (१९८५). *सर्वदर्शनसंग्रह, सटीप मराठी भाषांतर.* मुंबई: महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई .

कुलकर्णी, अ. र. (एन. डी.). शैव संप्रदाय. मध्ये त. जोशी, *मराठी विश्वकोश.*

कुलकर्णी, अ. र. (एन. डी.). सांख्यकारिका . मध्ये ल. जोशी, *मराठी विश्वकोश खंड १९ .* मुंबई: महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई .

चरक, म. (2010). *चरकसंहिता, श्रीचक्रपाणिदत्तविरचितया आयुर्वेददीपिकाव्याख्यया सहिता.* e-Caraka Samhita: http://niimh.nic.in/ebooks/ecaraka/ पासून प्राप्त

जोग, प. द. (१९९१). *वेदांत परिभाषा लघुकोश.* पुणे: अरविंद जोग, पुणे.

जोशी, ल. (एन. डी.). केवलाद्वैतवाद. मध्ये ल. जोशी, *मराठी विश्वकोश, खण्ड ४.*

जोशी, ल. (एन. डी.). पूर्वमीमांसा. मध्ये ल. जोशी, *मराठी विश्वकोश , खंड ९.* मुंबई.

जोशी, ल. (एन. डी.). योगदर्शन . मध्ये ल. जोशी, *मराठी विश्वकोश, खंड १४.* मुंबई.

जोशी, ल. (एन. डी.). *वैशेषिक दर्शन :, मराठी विश्वकोश, खंड १७.* मुंबई.

दीक्षित, श. ह. (एन. डी.). वेदान्त. मध्ये ल. जोशी, *मराठी विश्वकोश, खंड १४.* मुंबई.

पटवर्धन, श. अ. (एन. डी.). रसायन . मध्ये ल. जोशी, *मराठी विश्वकोश, खंड १४.* मुंबई.

पाण्डेय, प. (२००१). *महाकविकालिदासविरचितं कुमारसंभवम्.* वाराणसी : चौखम्बा विद्याभवन.

बापट, क. व. (१९०५). *रसरत्नसमुच्चयः .* पुणे: आनंदाश्रम, पुणे.

बाहादुर, र. (1961). *शब्दकल्पद्रुमः, वरदाप्रसाद-वसुना तदनुजेन हरिचरण-वसुना च अशेषशास्त्रविशारदकोविदवृन्दसाहाय्येन संपरिवर्द्धितः.* वाराणसी: चौखम्बा संस्कृत सीरीज आफिस.

भावमिश्र. (2012). *भावप्रकाशनिघण्टु.* e-nighantu: http://niimh.nic.in/ebooks/e-Nighantu/bhavaprakashanighantu/?mod=read&h=pArada पासून प्राप्त

मिश्र, आ. (१९५६). *सांख्यतत्त्वकौमुदी प्रभा.* प्रयाग: सत्यप्रकाश मंदिर, प्रयाग.

मिश्र, ड. (२०१०). *अष्टाध्यायीसूत्रपाठ.* दिल्ली: मोतीलाल बनारसीदास.

वेणीमाधवशास्त्री जोशी, न. ह. (१९६८). *आयुर्वेदीय शब्दकोश, संस्कृत-संस्कृत-मराठी, द्वितीय खंड, (प -ह).* मुंबई: महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

वेणीमाधवशास्त्री जोशी, न. ह. (१९६८). *आयुर्वेदीय शब्दकोश, संस्कृत-संस्कृत-मराठी, प्रथम खंड, (अ -न).* मुंबई: महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

श्रीनरहरिपण्डित. (2012). *राजनिघण्टु.* e-nighantu: http://niimh.nic.in/ebooks/e-Nighantu/rajanighantu/?mod=read&h=pArada पासून प्राप्त

साळुंखे, आ. ह. (एन. डी.). मंत्र. मध्ये *मराठी विश्वकोश, खंड .* मुंबई: महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई.

सुश्रुत. (2010). *सुश्रुतसंहिता, श्रीडल्हणाचार्यविरचितया निबन्धसङ्ग्रहाख्यव्याख्यया निदानस्थानस्य श्रीगयदासाचार्यविरचितया न्यायचन्द्रिकाख्यपञ्जिकाव्याख्यया च समुल्लसिता.* e-sushruta samhita: http://niimh.nic.in/ebooks/esushruta/ पासून प्राप्त

सोमदेव. (एन. डी.). *रसेन्द्रचूडामणि.* Gottengon: University of Göttingen, Germany .




Free Download, Borrow, and Streaming

eBook Publication Pvt. Ltd.

# प्रकाशनानि

## व्याकरणम्

- पाणिनीयं लिङ्गानुशासनम्
- शान्तनवाचार्यप्रणीतः फिटसूत्रपाठः
- तिङन्तरूपावलिः, प्रथमः भागः (भ्वादिगणः) तः
- तिङन्तरूपावलिः दशमः भागः (चुरादिगणः)........... [१० ग्रन्थाः]
- पाणिनीयशिक्षा
- आपिशलशिक्षा
- ऋग्वेदप्रातिशाख्यम्

## उपनिषद्ग्रन्थाः

- अमृतनादोपनिषद्
- आरुणिकोपनिषद्
- कलिसन्तरणोपनिषद्
- कृष्णोपनिषद्
- गर्भोपनिषद्
- जाबाल्युपनिषद्
- बह्वृचोपनिषद्
- ब्रह्मबिन्दूपनिषद्
- वासुदेवोपनिषद्
- सावित्र्युपनिषद्

## आयुर्वेदग्रन्थाः

- रसेश्वरदर्शन, मूळ संस्कृत संहिता, शब्दार्थ आणि मराठी भाषांतर
- रसतरङ्गिणी, मूळ संस्कृत संहिता, शब्दार्थ आणि मराठी भाषांतर

## काव्यशास्त्रग्रन्थाः

- काव्यालंकार, प्रथम परिच्छेद, मूळ संस्कृत संहिता, मराठी भाषांतर, पदार्थ व विवेचक टीपांसह

Email: publicationebook@gmail.com

Website: https://archive.org/details/@ebook_publcation